# आपले यज्ञ अभियान

**भारतीय संस्कृतीचे जनक यज्ञदेवता-** यज्ञदेवता हे भारतीय संस्कृतीचे पिता आहेत. यज्ञ हे भारतीय संस्कृतीचे आदी प्रतीक आहे. आपल्या संस्कृतीमध्ये वेदांचे जे महत्त्व आहे, तेच महत्त्वपूर्ण स्थान यज्ञांना देखील प्राप्त झाले आहे. वेदांमध्ये यज्ञाचा जेवढा उल्लेख आढळतो, तेवढा अन्य कोणत्याच विषयाचा केलेला आढळून येत नाही. खरे तर वैदिकधर्म यज्ञप्रधान आहे. यज्ञाला वैदिक धर्माचा प्राण म्हटले तर चुकीचे ठरणार नाही. प्राचीन भारताची कल्पना करताच मंत्रोच्चारासह यज्ञ करणाऱ्या ऋषी-मुनींचे चित्र डोळ्यासमोर उभे राहते. ऋषी-मुनीच नव्हे तर सामान्यजन, धनी-मानी आणि राजे या सर्वांच्या मनात यज्ञाबाबत अगाध श्रद्धा होती व ते हिरिरीने यामध्ये सहभागी होत असत. साधू-ब्राह्मण आपले एक तृतीयांश आयुष्य यज्ञकार्यातच खर्ची घालत असत. यज्ञामुळेच मनुष्य संस्कारित होऊन शूद्र व पशू स्तरापासून ब्राह्मण व देव स्तरापर्यंत पोहचतो, ही बाब सिद्ध झाली आहे. त्या काळच्या सुख, शांती व समृद्धीमध्ये यज्ञाचा सिंहाचा वाटा होता. का नसावा? कारण शेवटी ऋषींनीच याचा शोध व बोध मनुष्य, समाज व सृष्टीच्या सखोल ज्ञानाच्या, आकलना आधारे केला होता.

गतकाळाच्या सर्व चढउतारांमधे, स्थित्यंतरांमधे आपण यज्ञाची उपयोगिता व त्याच्या मूळ उपदेशासच विसरून गेलो आहोत. आपल्या हल्लीच्या दुर्दशेचे सर्वात मोठे कारण या विस्मृतीला मानले तर चूक ठरणार नाही. त्यात समाधानाची बाब अशी की आपण आपल्या यज्ञ परंपरेस अद्याप पूर्णतः विसरून गेलो नाही. प्रतीकपूजेच्या स्वरूपात का होईना? पण त्याचा पाठपुरावा करीत,

त्याचे निस्पंद शरीर मिरवीत आहोत. आज देखील यज्ञ याच रूपात आपल्या जीवन-मरणाचा सांगाती आहे. आपले कोणतेही शुभ वा अशुभ कार्य यज्ञाविना पूर्ण होत नाही. जन्मापासून मृत्यूपर्यंत जे सोळा संस्कार आहेत, त्या सर्वांमध्ये यज्ञ कोणत्या ना कोणत्या रूपाने व कमी जास्त प्रमाणात अवश्य केला जातो. पुढील दोन संस्कारांमध्ये तर यांचीच प्रधान भूमिका असते.

**विवाहाचा प्रमुख विधी-यज्ञ-** विवाह संस्कार अग्नीच्या साक्षीनेच पूर्ण होत असतो. वर-वधू याची पूजा व परिक्रमा पूर्ण करतात. असे मानले जाते की यज्ञाग्नी वधू-वराच्या आत्म्यास अतूट बंधनात बांधून ठेवतो, जसे वेल्डिंग करून लोखंडाच्या दोन तुकड्यांना जोडले जाते. अंत्येष्टी संस्कारामध्ये यज्ञाशी निगडित अनेक नियमांचे पालन केले जाते. चिता एक प्रकारे वेगळ्या आकृतीचा यज्ञच आहे. यामध्ये मृत देहाची आहुती यज्ञ देवतेस अर्पण केली जाते. देव संस्कृतीचे पुण्य प्रतीक असलेल्या यज्ञोपवीताचे तर नावच यज्ञाशी निगडित आहे. या पवित्र सूत्रास यज्ञाच्या साक्षीतच धारण केले जाते.

तसेही कथा-कीर्तने, व्रत-उपवास व अन्य सण-उत्सवांमध्ये यज्ञ कोणत्या ना कोणत्या रूपात अवश्य जुळलेला असतो परंतु की लोक याचे योग्य विधी-विधान व महत्त्व विसरून गेले आहेत. चिन्ह पूजा करूनच ते आपले काम कसे तरी भागवून घेतात. स्त्रिया आज देखील चुलीतून निखारे काढून किंवा गोवरी पेटवून त्यावर तूप, पक्वान्न किंवा मिष्टान्न नाहीतर लवंग समर्पित करून त्या भोवती चारही बाजूंनी पाणी फिरवतात व यज्ञाची प्रतीक पूजा करतात. सण-उत्सवांमध्ये 'होळी' हा तर यज्ञाचाच सण आहे. हल्ली बहुतेक लोक यास निव्वळ लाकडे वा गोवऱ्या जाळूनच

संपन्न करतात. परंतु शास्त्रांमध्ये याचा उल्लेख विशुद्ध रूपाने यज्ञाच्या रूपातच आहे. भारतासारख्या कृषिप्रधान देशात हा सण शेतातील पीक तयार झाल्याच्या आनंदाचा आहे. या सणात नवीन धान्यास (नवान्न) सर्व प्रथम यज्ञ भगवंतास अर्पण करून मगच संस्कारित अन्न ग्रहण करण्याचा श्रेष्ठ भाव असतो.

गीतापाठ, सत्यनारायण व्रतकथा, भागवत सप्ताह, रामायण पारायण या सारख्या धार्मिक कार्यक्रमांमध्ये यज्ञ अवश्य केला जातो.. साधना-अनुष्ठाने, मग ती वेदोक्त असोत की तांत्रिक, त्यांत हवन अनिवार्य असते. यज्ञाविना गायत्री साधना अपूर्ण मानली जाते. गायत्री साधना, अनुष्ठान व पुरश्चरणामध्ये समानपा करता जपाच्या एक दशांश जप किंवा एक शतांश हवन केले जाते. देवी-देवतांचे पूजन कोणत्या ना कोणत्या रूपात यज्ञाशीच संबंधित असते. पूजा-वेदीवरील धूप-दीप आणि उदबत्ती हे यज्ञाचेच प्रतीक असतात.

तीर्थ स्थळांशी यज्ञाचा जवळचा व गहिरा संबंध आहे. प्राचीन तीर्थक्षेत्रे अशीच स्थळे बनलीत, जिथे विराट-विशाल महायज्ञ संपन्न झाले होते. 'प्रयाग' या तीर्थ क्षेत्राचे नाव याग (यज्ञ) शद्बाशी जुळलेले आहे. बरेच विराट महायज्ञ झाल्यामुळेच हे स्थान 'तीर्थराज प्रयाग' म्हणून संबोधिले गेले. काशी वाराणशीच्या दशाश्वमेध घाटावर भगवान श्रीरामचंद्रांनी अश्वमेधयज्ञ करविले होते. त्यांच्याच प्रभावामुळे यास प्रमुख तीर्थाचा दर्जा प्राप्त झाला आहे. कुरुक्षेत्र, रामेश्वरम, नैमिषारण्य इत्यादी अशीच प्रसिद्ध तीर्थक्षेत्रे मोठ मोठ्या यज्ञांनीच बनली आहेत.

यज्ञांच्या वैशिष्ट्यपूर्ण आयोजनांमुळेच भारतभूमीस अवतारीसत्तांची कर्मभूमी बनण्याचा गौरव प्राप्त झाला आहे.

ब्रह्मपुराणात वर्णन येते की "भारत भूमीचे यती तपश्चर्या करतात, हवन करतात व आदराने दान करतात. जंबूद्वीपामध्ये सत्पुरुषांद्वारे यज्ञ देवतेचे यजन होत असते. यज्ञामुळेच यज्ञ पुरुष जंबूद्वीपातच निवास करतात. या जंबूद्वीपामध्ये भारत वर्ष सर्वश्रेष्ठ आहे. यज्ञांना प्राधान्य असल्यामुळेच यास कर्मभूमी आणि अन्य द्विपांना भोगभूमी म्हणतात."

यज्ञाग्नीच्या रूपात परमेश्वराच्या उपासनेचा शुभारंभ ही आपल्या प्राचीन पूर्वजांची जगाला दिलेली एक अद्भुत व मौलिक देणगीच आहे. ईश्वर स्वयं निराकार आहे म्हणून तो मनुष्याच्या इंद्रियांच्या आणि मन-बुद्धीच्या पलीकडचा, आवाक्याबाहेरचा आहे. व्यावहारिकरूपात आपण त्याचे दर्शन व्यक्तीच्या सद्गुण, सच्चिंतन व सत्कर्मांच्या रूपात करू शकतो. दुसऱ्या प्रकारे आपण या विश्व-ब्रह्मांडास त्याचे विराट रूप मानून सेवा-साधनेद्वारे त्याची आराधना करू शकतो. उपासनेच्या पूजा-प्रतीकरूपात त्याचे अग्नीपेक्षा अधिक चांगले प्रतीक दुसरे कोणतेच होऊ शकत नाही. जगाचा सर्वाधिक प्राचीन ग्रंथ ऋग्वेदाचा पहिला मंत्र 'अग्निमीळे पुरोहितं' मध्ये अग्नीस ईश्वराच्या प्रतिमेच्या रूपात मानले आहे. यालाच भिन्न-भिन्न नावांनी ब्रह्मतेज, दिव्यज्योती, पवित्रप्रकाश, डिव्हाइन लाइट, लेटेन्ट लाइट इत्यादी रूपांमध्ये जाणले जाते. "अग्ने नय सुपथा राये" या मंत्रात या समर्थ शक्तीची आम्हाला योग्य मार्गावर नेण्याची प्रार्थना केली आहे. हाच भाव गायत्री मंत्राच्या "धियो यो नः प्रचोदयात्" या पदामधे केलेल्या प्रार्थनेचा आहे.

**यज्ञ म्हणजे काय?**- स्थूल रूपाने यज्ञ म्हणजे अग्निकुंडात मंत्रोच्चार करीत हवन सामग्रीची आहुती देणे असेच समजले जाते. हा तर यज्ञाचा कर्मकांडात्मक भौतिक पक्ष आहे. सर्वसामान्यपणे यास 'हवन' नावाने जाणले जाते. याचेच दुसरे नाव 'अग्निहोत्र'

आहे. परंतु यज्ञाचा याहूनही व्यापक अर्थ आहे तो म्हणजे- देवपूजन, संगतीकरण व दान.

आध्यात्मिक रूपात देवपूजनाचा अर्थ होतो- ईश्वरी शक्तींची उपासना व आराधना; संगतीकरणाचा अर्थ आहे- त्याचे सामीप्य आणि सहवास, दानाचा अर्थ होतो- स्वतः कमावलेल्या वस्तू त्यांना अर्पण करणे.

व्यवहारी जीवनात आपल्यापेक्षा मोठ्या व पूज्य व्यक्तींचा सन्मान करणे ही देवपूजा मानली जाते आणि जे समवयस्क आहेत त्यांची संगत व मैत्री म्हणजे संगतीकरण. आपल्या पेक्षा जे लहान आहेत, अल्प साधन व अल्प शक्तियुक्त आहेत त्यांना कोणत्या ना कोणत्या प्रकारे साहाय्य करणे हे दान आहे.

श्रेष्ठगुणसंपन्न सत्पुरुषांची सेवा करून सहवास व सहयोग देणे हा देखील एक यज्ञच आहे. याचप्रकारे ईश्वराची उपासना, चांगल्या बाबी व सद्गुणांची वृद्धी व पारस्परिक सहयोग-सहकार्य यांना देखील यज्ञ मानले जाते.

सर्वसामान्यरूपात प्रचलित हवन किंवा अग्निहोत्रातही यज्ञाच्या या विशेष बाबी स्पष्ट दिसून येतात. मंत्रोच्चारणासोबत देवशक्तींचे आवाहन, पूजन व स्वागत-सत्कार केला जातो. यज्ञ-हवन मिळून मिसळून, आपापसात सहयोग-सहकार्य करूनच सामुहिकपणे संपन्न केले जाते. आपला भावपूर्ण सहयोग व साधन-सामग्रीच्या रूपात दानाची क्रिया संपन्न होत असते.

यज्ञामध्ये 'इदं न मम' (हे माझे नाही)चा त्यागमय आदर्श प्रस्तुत केला जातो. या भावनेच्या विकासानेच एक सभ्य समाज निर्माण होऊ शकतो. आपल्या प्रिय वस्तू, घृत, मिष्टान्न, मेवे, औषधी द्रव्य, अन्नादींचे हवन करून ते आपण वायुमंडळात विस्तारित

करून प्राणिमात्रास लाभान्वित व जीवनास यज्ञमय बनविण्याचाच अभ्यास करीत असतो. मनुष्याने आपली संपत्ती, विद्या, प्रतिष्ठा, योग्यता, प्रभाव व पद आदींचा उपयोग आपल्या सुखासाठी, स्वार्थासाठी कमीत कमी करून, समाजास त्यांचा अधिकाधिक लाभ द्यावा, हाच भाव यज्ञात दडलेला आहे.

अशा प्रकारे यज्ञाचा ढोकळमानाने अर्थ होतो- पुण्य-परमार्थ व औदार्य युक्त सेवा-साधना. आपल्या स्वार्थी, कृपण व विलासी वृत्तीचा त्याग करून सर्वांच्या हितामध्ये आपले हित मानण्याचा श्रेष्ठ मार्ग आहे. सार रूपात यज्ञ म्हणजे आपल्या इच्छा व प्रिय वस्तूंचा आनंदाने त्याग करणे, जेणेकरून इतरांना लाभ मिळावा.

**सृष्टी चक्राचे नाभिकेंद्र यज्ञ-** खरे तर संपूर्ण सृष्टीचा आधारच यज्ञ आहे. हिची उत्पत्तीच यज्ञापासून झाली आहे. प्रत्येक कार्य व अणू-रेणू यज्ञीय भावनेच्या आधारे प्रभावित व संचालित होत आहे. श्रीमद्भागवतामध्ये यज्ञाद्वारे सृष्टीच्या रचनेचे सविस्तर वर्णन आले आहे. गीतेत भगवान श्रीकृष्ण म्हणतात- "सृष्टी यज्ञाद्वारेच उत्पन्न झालेली आहे व यज्ञामुळेच ती टिकून आहे, स्थिर आहे व सुव्यवस्थित आहे."

यज्ञीय शृंखलेत समुद्र उदार अंतःकरणाने आपले जल ढगांना देतो. ढग ते महत् प्रयासाने दूरवर घेऊन जातात. सूर्य आपली उष्णता देतो, ती ग्रहण करून ढग पृथ्वीवर पर्जन्यवृष्टी करतात. हे जल नदी-नाले धारण करतात व मनुष्य, जीवजंतू यांची तसेच पृथ्वी मातेची तहान भागवितात. वृक्ष-वनस्पती, फुले-फळे आपला लाभ दुसऱ्यांनाच देतात. सूर्य, चंद्र, वायू, नक्षत्र हे सर्व परोपकारासाठीच अहर्निश कार्यरत आहेत.

याच प्रकारे शरीराचे प्रत्येक अंग-अवयव मिळून संपूर्ण शरीरास संचालित व सक्षम करीत आहेत. त्याचा लाभ मनुष्यास देतात. बाल शिशूचे पालन-पोषण, जडण-घडण मातेच्या यज्ञ भावनेच्या छायेतच होत असते. जर तिने आपल्या रक्त व मांसाचा एक अंश शिशू निर्मितीमध्ये लावला नसता, अपत्य जन्माची प्रसव पीडा सहन केली नसती, शरीर पिळून दूध पाजले नसते, त्याच्या पालन पोषणाचे कष्ट सहन केले नसते तर मनुष्य जीवन अशक्य होऊन गेले असते. मातेचा त्याग व निःस्वार्थ भावनाच मानवी जीवनास घडवीत असतात.

मनुष्याचा जन्म यज्ञ भावनेद्वारेच शक्य होतो. गीतेमध्ये भगवान कृष्ण म्हणतात- "प्रजापतीने यज्ञास मनुष्याच्या जुळ्या भावाप्रमाणे उत्पन्न केले आणि अशी तरतूद केली की दोघांनी ही एकमेकांचे पोषण करीत विकसित, पल्लवित-पुष्पित व्हावे. मनुष्याच्या विकासाची व प्रगतीची कहाणी यज्ञभावनेशी जुळलेली आहे. जर मनुष्याने यज्ञाचा अंगीकार केला नसता आणि त्याने एकलकोंडेपणा, स्वार्थ आणि क्षुब्ध चित्तवृत्तीस प्राधान्य दिले असते, त्याचे अस्तित्व केव्हाच नष्ट झाले असते. हल्लीच्या संकटकालीन वातावरणात व परिस्थितींमध्ये देखील उज्ज्वल भविष्याच्या ज्या शक्यता बाकी आहेत, त्या यज्ञ भावनेच्या आधारावरच टिकून आहेत.

अशा रीतीने स्पष्ट होते की व्यक्तीची उन्नती असो की समाजाचा विकास असो, हे सर्व परस्परांच्या सहयोग-सहकार्य व त्यागाच्या यज्ञीय भावनेवरच अवलंबून आहे. ग्रह-नक्षत्र सुद्धा केवळ आपापसातील आकर्षणमुळेच बांधलेले नाहीत, तर त्यांच्यामध्ये महत्त्वपूर्ण आदान-प्रदान पण सुरू आहे. हीच गोष्ट परमाणू व जीवाणूंच्या अदृश्य सूक्ष्म जगतास देखील लागू पडते.

संपूर्ण सृष्टीच या भावनेवर चालत आहे व ती आपल्या महाप्रवासात आगेकूच करीत आहे. ही यज्ञीय भावना नाहीशी झाली, तर संपूर्ण व्यवस्था, सौंदर्य आणि प्रगती इत्यादी अव्यवस्थितपणा, कुरूपता आणि विनाशामध्ये परिवर्तित व्हायला वेळ लागणार नाही. उपनिषदांमध्ये योग्यच म्हटले आहे की- यज्ञ या सृष्टीचा अक्ष (आस) आहे, नाभिकेंद्र आहे. आस नसेल तर गाडी एक पाऊल सुद्धा पुढे जाऊ शकणार नाही. तद्वतच यज्ञ रूपी अक्षाविना, नाभिविना जीवन, समाज व सृष्टीरूपी गाडी एक इंच सुद्धा पुढे जाऊ शकत नाही.

**यज्ञाग्नीचा प्रचंड प्रेरणा प्रवाह-** यज्ञ ही ऋषींनी शोधून काढलेली एक महत्त्वपूर्ण विधा आहे. त्याबरोबर सबळ भौतिक व आध्यात्मिक लाभ संलग्न आहेत. त्यात मानवास जीवनलक्ष्याशी जोडणारा प्रचंड प्रेरणाप्रवाह आहे. खऱ्या अर्थाने जीवनास यज्ञमय बनविण्याचें शिक्षण याचे खास वैशिष्ट्य आहे, त्यामुळेच यज्ञास भारतीय संस्कृतीमध्ये एवढे अधिक महत्त्व देण्यात आले. यज्ञाग्नीपासून मिळणाऱ्या शिक्षणाचे, प्रेरणांचे जर थोडे सुद्धा चिंतन-मनन करून त्यांचा आपल्या जीवनात अंगीकार करण्याचा प्रयत्न सुरू केला तर जीवन सार्थकतेच्या दिशेने वाटचाल करू लागेल. यज्ञाग्नीच्या काही महत्त्वपूर्ण प्रेरणा अशा-

१. अग्नीचे सर्व प्रथम वैशिष्ट्य म्हणजे त्याची उष्णता. आपण देखील आपल्या विचारांत व स्वभावात अग्निप्रमाणे तेजस्विता आणावी. आळस-प्रमाद, चाल-ढकल, शिथिलपणा, नैराश्य, विषाद यासारख्या जडतायुक्त दुर्गुणांना दूर करण्याचा प्रयत्न करीत राहावे व त्यांच्या जागी अग्नीच्या उष्णतेस धारण करून स्फूर्ती, जागृकता, आशा-उल्हास व उत्साहयुक्त जीवन जगण्याचा अभ्यास करावा.

आपल्या नसा-नसांमधून उष्ण रक्त वाहिले पाहिजे. काम करण्यासाठी भुजा स्फुरण पावाव्या, तसेच आपले डोके सत्-पक्षाच्या बाजूने राहून वाईटांशी संघर्ष करण्यात तत्पर व उत्साही असले पाहिजे.

२. अग्नीचे दुसरे वैशिष्ट्य आहे- त्याचा प्रकाश. अग्नी जिथे कुठे असेल तिथे आपला प्रकाश पसरल्याविना राहणार नाही. आपण सुद्धा याचे उपासक बनून स्वतःमध्ये ज्ञानाग्नी प्रज्वलित करून त्याचा प्रकाश पसरवावा. "तमसो मा ज्योतिर्गमय" मंत्रास जीवनात धारण करून अज्ञानांधकारास ज्ञानाच्या प्रकाशाने दूर करण्याचा प्रयत्न करावा.

३. यज्ञाग्नीमध्ये जी काही हवन सामग्री टाकली जाते, ती तो आपल्या जवळ साठवून ठेवीत नाही, तर तिला वायुभूत करून सर्वांपर्यंत पोहचवीत असतो. तिचा लाभ मनुष्य, जीव-जन्तू, वातावरण, वनस्पती या सर्वांना मिळत असतो. आपण सुद्धा आपली धन-संपत्ती, बल-बुद्धी आणि प्रतिभा-कौशल्यास स्वतः पुरते न ठेवता, त्यांना आपल्या इष्ट देवास समर्पित करून त्याचा लाभ सर्वांपर्यंत पोहचवावा. आपल्या जवळ तेवढेच ठेवावे, जेवढ्याने उदरनिर्वाह, जीवननिर्वाह सुरळीतपणे सुरू राहील. अनावश्यक संग्रह व मालकीचा मोह न ठेवता, जे काही शिल्लक राहिले असेल ते परमार्थामध्ये खर्च करावे, दान करावे.

४. अग्नी हा लाकूड, कोळसा इत्यादीस आपल्यासमान बनविण्यास तेव्हाच समर्थ होतो, जेव्हा तो स्वतः उष्णता व प्रकाशगुणांना धारण करतो, आपण ज्या गुणांना इतरांमध्ये पाहू इच्छितो ते आधी स्वतःमध्ये धारण करावे. वाणीऐवजी आपल्या आचरणाद्वारे स्वतःचे उदाहरण सिद्ध करून सार्थक व प्रभावी

उपदेश द्यावा. आपण जसे वातावरण आपल्या कुटुंबात व चहूकडे इच्छितो, तसेच स्वतःला बनविण्याचा प्रयत्न करावा.

५. अग्नी मध्ये कोणतीही वस्तू टाकली की तो तिला स्वतः समान बनवितो. आपणदेखील अग्नीसारखी तेजस्विता व प्रकाशगुणांना धारण करावे व इतरांनासुद्धा तसे बनण्याकरिता सहयोग द्यावा.

६. अग्नी हा मलीन, घाणेरड्या वा अन्य कोणत्याही वस्तूंच्या संपर्कात येऊनही आपले गुण हरवून बसत नाही, उलट त्या वस्तूसुद्धा आपल्या सारखेच बनवून टाकतो. आपण देखील स्वतःमधे अशी विशेषता उत्पन्न करावी की संपर्कात येणाऱ्यांच्या वाईट बाबी व स्वभाव-सवयीमुळे आपण तसे न बनता आपले सद्‌गुण व चांगल्या बाबींमुळे त्यांनाही आपल्यासारखेच बनवून योग्य श्रेयपथावर पुढे न्यावे.

७. अग्नीच्या ज्वाळावर हवेचा कितीही दाब आला तरी त्या नेहमी वरच्या दिशेलाच झेपावतात. असेच आपणसुद्धा प्रत्येक भय व प्रलोभनाच्या दबावाला बळी न पडता सतत उर्ध्व दिशेने उंचावत राहावे आणि आपल्या निश्चित जीवनलक्ष्याकडे अग्रेसर व्हावे.

८. अग्नीची राख आपणास आपले जीवन व शरीर नाशवान असल्याचे स्मरण करून देते. "शेवटी गोळा-बेरीज मूठभर राख" हेच सत्य विसरल्यामुळे आपण लोभ-मोहाच्या पाशात अडकतो व पाप-तापाचे गाठोडे भारी करीत जातो. यज्ञाची राख कपाळास लावते वेळी आपण आपल्या अंतिम परिणामाचे ध्यान करावे, शेवटचे दृश्य साक्षीरूपात बघावे. त्यापासून बोध व संकल्प घ्यावा की आम्ही जीवनाचा सदुपयोग करू, दुष्कर्मांपासून दूर राहून

पुण्य-परमार्थाचे भांडवल वाढवीत जाऊन जीवनाचा अंत संतोषजनक व पुढील यात्रा सुखद बनविण्याकरिता प्रयत्न करीत राहू.

९. जोपर्यंत अग्नी कायम असतो, तोपर्यंत तो आपली उष्णता व प्रकाशाचा गुणधर्म सोडत नाही. आपल्यामध्ये देखील परिश्रम-सक्रियतेची उष्णता व धर्मपरायण जीवनाचा प्रकाश शेवटपर्यंत कायम राहावा, यासाठी प्रयत्न करीत राहावे. आपले जीवन पुरुषार्थ व कर्तव्यनिष्ठेने परिपूर्ण असावे.

**धर्म ग्रंथांमध्ये यज्ञाचे गुणगान-** आपल्या धर्मग्रंथांमध्ये पदोपदी यज्ञाचे माहात्म्य वर्णन केलेले आहे. मानवास त्याचे महत्त्व समजावून सांगतांना त्याला जीवनात पुरेपूर सामील करण्याचा, अंगीकार करण्याचा सल्ला दिला आहे, आग्रही प्रतिपादन केले आहे. वेदग्रंथांमध्ये तर यज्ञालाच सर्वाधिक प्राधान्य दिले आहे. ऋग्वेदात म्हटले आहे- "यज्ञानुष्ठानाची महान उपासना बंद करू नये. जेथे यज्ञ केले जात नाहीत वा यज्ञ करणे बंद केले जाते, तेथून सुख-शांती निघून जाते. (२/३०/६). प्रत्येक शुभ कार्याचा प्रारंभ यज्ञाने करावा. यज्ञासोबत सुरू केलेली कार्ये सफल होतात. (१०/१०/२). विश्वशांतीचा सर्वश्रेष्ठ आधार यज्ञच आहे. (१०/६६/२)."

यजुर्वेदामध्ये यज्ञाचा उल्लेख अशा प्रकारे केला आहे- "सुख-शांतीची इच्छा करणारी कोणतीही व्यक्ती यज्ञाचा त्याग करीत नसते. जो यज्ञास सोडतो, त्यास यज्ञरूपी परमात्माही सोडून देतो. (२/२२). हा यज्ञाग्नी पर्जन्यवृष्टी करविणारा, धन देणारा तसेच पुष्टी व शक्ती वृद्धिंगत करणारा आहे. (३/४०). ज्याच्या अंतरंगात प्रदीप्त यज्ञज्वाळा विराजमान असतात, तेथे

अज्ञान, अंधार व असुरत्व इत्यादी कसे राहू शकतील? खरा यज्ञ कर्ता शेवटी संपूर्ण अंधकार आणि अज्ञानापासून मुक्त होऊन परमेश्वराच्या चरणी जाऊन पोहचतो. (३/३८). हे यज्ञ देवता! तुम्ही सुखकर आहात, आश्रय घेण्यायोग्य आहात, तुमच्यामुळे रोग नष्ट होतात, तसेच रोगाचे किटाणू-विषाणू सुद्धा नष्ट होतात, तुम्ही पृथ्वी साठी त्वचेप्रमाणे रक्षक आहात (१/१४). यज्ञच प्रमुख धर्म आहे (३१/६). हे यज्ञ देवा! तुम्ही देवतांचे भोजन त्यांच्यापर्यंत पोहचविता, तुमच्यामुळे त्यांना ते मिळते, म्हणून या हवी द्वारे तुम्ही त्यांना प्रसन्न करा, ज्यामुळे ते प्रसन्न होऊन यज्ञकर्त्यास सुख व कल्याण प्रदान करतील (१/२०). अथर्ववेदामध्ये उल्लेख आहे की यज्ञ न करणाऱ्यांचे तेज नष्ट होऊन जाते. जे हवन करतात, त्यांच्या मनात परमात्म्याचे तेज प्रकाशित होते (६/१५). यज्ञ करणाऱ्यास स्वर्गसुख प्राप्त होते (१६/४/२).

शतपथ ब्राह्मण ग्रंथामधे यज्ञास सर्वश्रेष्ठ कर्म मानले आहे. तैत्तरीय ब्राह्मण ग्रंथानुसार यज्ञाचे पुण्यफळ कधीच नष्ट होत नाही व मनुष्याने बुद्धिमत्ता दाखवून अक्षयपुण्य संचित करीत राहावे. कठोपनिषदातील यम-नचिकेता संवादामध्ये यज्ञास स्वर्गप्राप्तीचे प्रथम साधन म्हटले आहे. प्रश्नोपनिषदामध्ये यज्ञास देवता, पितर आणि ऋषींचा प्राण म्हटले आहे. सरस्वती उपनिषदानुसार यज्ञानेच ऐश्वर्याची प्राप्ती होत असते, यज्ञानेच सरस्वती प्रसन्न होते.

रामायणात देखील यज्ञाचे माहात्म्य विस्ताराने वर्णिले आहे. दशरथ राजाचे चारही पुत्र यज्ञाचाच प्रसाद होते. भगवान राम आपल्या अवताराचे श्रेय यज्ञ भगवंतालाच देतात. रावण सुद्धा यज्ञाच्या शक्तीशी परिचित होता, म्हणून तो ऋषी-मुनींच्या यज्ञांमध्ये विघ्न आणून ते नष्ट करण्यासाठी राक्षसांना प्रवृत्त करीत असे.

आपल्या पराजयाच्या भयाने चिंतित व दुःखी होऊन त्याने अंतिम ब्रह्मास्त्ररूपी यज्ञाचाच आधार घेतला होता. बिभीषणासह लक्ष्मणाने मेघनाथ करीत असलेल्या तांत्रिक यज्ञाचा नाश केला होता. तो यज्ञ यशस्वी झाला असता, तर असुरांना अजेय शक्ती मिळाली असती, जिच्या साहाय्याने ते रामाच्या सेनेस नष्ट करून विजयी बनले असते.

महाभारतात वर्णन आहे- यज्ञाद्वारे लोक-परलोकाचे सुख प्राप्त होते. यज्ञासमान अन्य कोणतेच दान विधान नाही. यज्ञातच सर्व धर्माचे उद्दिष्ट समाविष्ट आहे. असुर व सुर हे दोघेही पक्ष पुण्याचा मूळ हेतू असलेल्या यज्ञासाठी प्रयास करीत असत. सत्पुरुषांनी सदैव यज्ञपरायण असले पाहिजे. यज्ञामुळेच बरेचसे सत्पुरुष देवता बनले.

गीतेमध्ये यज्ञावर भरपूर चर्चा आहे. गीतेत म्हटले आहे- यज्ञ न करणाऱ्यास लोक व परलोक काहीच प्राप्त होत नाही. यज्ञानिमित्त केलेल्या कर्मांव्यतिरिक्त इतर सर्व कर्मे बंधनकारक होतात. यज्ञ, दान आणि तप ही तिन्ही कर्मे पवित्र करणारी आहेत. या यज्ञाद्वारे देवतांची उन्नती करा व ते देवग तुम्हा लोकांची उन्नती करोत. परस्परांची उन्नती करीत श्रेयास प्राप्त व्हाल.

पद्मपुराणात म्हटले आहे- अग्निहोत्रापेक्षा अधिक पवित्र कर्म या जगात अन्य कोणतेच नाही. सर्व पापांमध्ये रत असलेली व्यक्ती देखील यज्ञ करून पापमुक्त होते. शिव पुराणात म्हटले आहे- सर्व बाधांच्या निवृत्तीसाठी बुद्धिमान पुरुषांनी देवतांची यज्ञाद्वारे पूजा केली पाहिजे. अग्नी पुराणात देखील श्रीकृष्ण युधिष्ठिरास शांती, पुष्टी वृद्धी करणाऱ्या आणि सर्व कार्ये सिद्ध

करणाऱ्या कृत्याच्या रूपात यज्ञाचा सल्ला देतात व म्हणतात जो पुरुष ज्या कामनेने यज्ञ करतो, त्याची ती कामना अधिक प्रमाणात फलवती होते. तसेच जो निष्काम भावनेने यज्ञ-हवन करतो, तो परब्रह्म प्राप्त करतो.

श्रीमद्भागवतामध्ये यज्ञाच्या महत्तेचे सविस्तर वर्णन आहे. यामध्ये सृष्टीचा आरंभ यज्ञाने झाल्याचे सांगितले आहे. महाप्रतापी सम्राट भरताच्या नावाने देशाचे नाव भारतवर्ष पडले. भरताने यज्ञांद्वारेच या देशास तपोभूमी बनविले होते. भागवत पंचम स्कंधामध्ये उल्लेख आढळतो की सम्राट भरताने सर्वप्रकारे पूर्ण विधी युक्त शंभर अश्वमेध यज्ञ केले होते.

**यज्ञातील अद्भुत विज्ञानाच्या लुप्त झालेल्या काही बाबी-** यज्ञामध्ये जे काही धन, साधन-सामग्री, वेळ, परिश्रम नियोजित केला जातो, तो कधीच वाया जात नाही, निरर्थक ठरत नाही. हे सर्व एक प्रकारे देवतांच्या बँकेत जमा होत असते. आणि योग्य वेळी समाधानकारक व्याजासह परत मिळत असते. विधी-विधानपूर्वक व व्यवस्थितरीत्या केलेले यज्ञ तर अधिकच महत्त्वपूर्ण सिद्ध होतात. ते एक प्रकारचे दिव्य अस्त्र बनतात. प्राचीन काळी यज्ञ एक प्रकारच्या सुव्यवस्थित विज्ञानाच्या रूपात विकसित होते. याद्वारे मनोवांछित पर्जन्यवृष्टी होत असे, योद्धे युद्धामध्ये विजयश्री प्राप्त करीत असत व योगी आत्मसाक्षात्कार करीत असत. यज्ञास वेदांमध्ये 'कामधुक्' म्हटले गेले आहे, अर्थात् समस्त अभाव दूर करणारा, बाधा हटविणारा व मनोकामना पूर्ण करणारा.

इतिहास-पुराणांची अशी कित्येक पाने अशा प्रसंगांनी भरलेली आढळतात, जी यज्ञाच्या या पक्षास स्पष्ट करतात. पूर्वीच्या काळी पुत्रप्राप्तीसाठी पुत्रेष्टी यज्ञ करविले जात असत. ज्यांना मुले-

बाळे होती, ती देखील गुणी व प्रतिभासंपन्न संतती प्राप्तीसाठी पुत्रेष्टी यज्ञ करवून घेत असत. दशरथ राजाने याच उद्देशाने ऋष्यशृंग ऋषीच्या अधिपत्याखाली पुत्रेष्टी यज्ञ करवून घेतला होता व त्याद्वारे राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्नाच्या रूपात चार अलौकिक पुत्र प्राप्त केले होते. भागवत पुराणात चित्रकेतू राजाला पुत्रप्राप्ती झाल्याचा उल्लेख आहे. यासाठी त्यांनी महर्षी अंगिराचे सहयोग-सहकार्य घेतले होते.

द्रुपदराजकन्या द्रौपदीचा जन्म सुद्धा यज्ञापासूनच झाला होता. स्वयंभुव मनु व शतरूपा राणीने भगवंतास आपल्या मांडीवर खेळविण्याची कामना केली होती. या कामना पूर्तीसाठी त्यांनी यज्ञ केला, ज्याचे पौरोहित्य त्यांच्या इला नामक कन्येने केले होते. सृष्टी निर्मितीचे कार्य ब्रह्मदेवाकडे सोपविले तेव्हा त्यांनी त्यासाठी आवश्यक क्षमता व सामग्री ही गायत्री साधना व यज्ञाव्दारेच प्राप्त केली होती. कार्तिकेयाचे पालन ज्या सहा कृत्तिकांनी मिळून केले होते, त्या सहा प्रकारच्या यज्ञाग्नीच होत्या. कार्तिकेयाने अशा असुरांना हरविले होते, ज्यांना सर्व देव मिळूनही हरवू शकले नव्हते.

च्यवन ऋषीचे वार्धक्य व अंधत्व दूर करण्यासाठी एक महायज्ञ झाला होता. त्याचा प्रसाद त्यांना एका अवलेहाच्या रूपात प्राप्त झाला होता. तो भक्षण केल्यावर ते पुन्हा नवयौवन व दृष्टी प्राप्त करण्यात समर्थ झाले होते. गायत्री तंत्राच्या एका अध्यायात विविध कामना पूर्ण करण्यासाठी विविध औषधी द्रव्यांच्या हवनाचा उल्लेख आहे.

परीक्षित राजास तक्षक नागाने दंश करून त्याची जीवनलीला संपवून टाकली, तेव्हा त्यांचा पुत्र जनमेजय याने

सूड घेण्यासाठी सर्पयज्ञ केला होता, त्याच्या शक्तीने साप बळेच ओढले जाऊन कुंडात पडून भस्म होऊ लागले होते. इंद्राच्या आश्रयाला गेल्यामुळे तक्षक आपला बचाव करू शकला. राजा नहुष यज्ञाद्वारे इंद्रपदाचे अधिकारी बनले होते. राजा बलीने एवढे यज्ञ केले होते की त्यामुळे तो त्या काळातील सर्वाधिक शक्तिशाली राजा बनला होता.

शुक्राचार्य असुरांचे गुरू होते. ते आपल्या यजमानांना शक्तिशाली सिद्धी प्राप्त व्हाव्यात म्हणून अनेक प्रकारचे तांत्रिक यज्ञ करीत असत. वालीस यज्ञाच्या सामर्थ्यानेच अजेयत्व प्राप्त झाले होते. भगवान राम देखील त्याच्या समोर जाऊन त्याला जिंकू शकले नसते म्हणून त्यांनी ताड वृक्षाच्या आड लपून बाण मारून त्याचा वध केला होता.

अशा प्रकारे प्राचीन काळी यज्ञ हा एका अद्‌भुत विज्ञानाच्या रूपात विकसित झाला होता, जो इच्छित फळ देण्यास समर्थ होता. यातील महत्त्वपूर्ण कड्या काळाच्या प्रवाहात गडप झाल्या; त्या पुन्हा प्राप्त करण्यासाठी नवीन संशोधनाची आवश्यकता आहे. यज्ञाच्या या गूढ पक्षास सोडून दिले, तरी याचा सामान्य विधी सुद्धा स्वतःच भरीव, भौतिक व आध्यात्मिक लाभ देण्यास समर्थ आहे. व्यक्ती, समाज आणि पर्यावरणाच्या वर्तमान संकटाचे प्रभावी समाधान यात दडलेले आहे. या दिशेने शांतिकुंज हरिद्वारच्या ब्रह्मवर्चस संशोधन केंद्रामधील आधुनिक उपकरणांनी सुसज्जित यज्ञशाळेमध्ये अभिनव प्रयोग झाले आहेत. सुरू असलेल्या वैज्ञानिक शोध-संशोधन कार्यांतर्गत याचे नवनवीन पक्ष समोर येत आहेत.

**यज्ञाद्वारे वातावरणाची शुद्धी-** वायुशुद्धी यज्ञाचे प्रमुख

वैशिष्ट्य आहे. मनुष्याच्या निवासस्थानी दुर्गंध, कोंदटपणा, केरकचरा, घाण व जाळे कोणत्या ना कोणत्या रूपात साचत जाते व यातच रोगजंतू उपजतात व वेगाने वाढून पसरतात. जर तेथील वायू शुद्ध केले नाही, तर त्यात रोगाणू-किटाणूंची भरमसाट वाढ होईल. यांची साफ-सफाई करण्यासाठी गुग्गुळ, कापूर, राळ, ऊद इत्यादी पदार्थांच्या गुणधर्मांशी सर्वच परिचित आहेत. हे पदार्थ वायुशुद्धीसाठी जाळले जातात. तुपाच्या दिव्याचेही हेच वैशिष्ट्य आहे. गुळ-साखर जाळल्याने रोगाणू-विषाणूंचा नाश होतो. मलेरियाच्या कोंदट वायूस शुद्ध करण्यासाठी कडू निंबाची वाळलेली पाने जाळली जातात.

सर्वसामान्यपणे सूर्याच्या किरणांद्वारे देखील याचा विशिष्ट मर्यादिपर्यंत उपचार होत असतो. खिडक्या उघडून, कपडे व बिछान्यांना उन्हात सुकवून, खाद्य पदार्थ व धान्यास उन्हात वाळत घालून हा उद्देश पूर्ण केला जातो. सूर्याची उष्णता रोगजंतूंचा नाश करते, तेथेच व्हिटॅमीन-डी चा लाभ सुद्धा मिळतो. यज्ञाची सुगंधित वाफ व ऊर्जा या कार्यास खूपच चांगल्या प्रकारे संपन्न करतात. घराच्या आत व बाहेर संपूर्ण वातावरणामध्ये जिथे कुठे हे पोहचतील, तिथे दुर्गंध नाहीसा करून सुगंध पसरवतात. हानीकारक कीटाणू व विषाणूंना मारून टाकतात तसेच उपयुक्त कृमी-किटकांचे पोषण करतात.

यज्ञीय ऊष्मे मुळे वातावरणातील हवा गरम होऊन हलकी बनते. परिणामी ती वर-वर जाऊ लागते व आसपासची हवा हिचे स्थान घेते व यज्ञाच्या ऊष्मेने, ऊर्जेने किटाणू मुक्त होऊन वर जाऊ लागतात व दूर-दूर पर्यंत पसरत जातात. अशा प्रकारे आपोआप वायुशुद्धीचा क्रम सुरू राहतो. यासोबतच सुगंधित

जडीबुट्टी, कंद-मुळ व औषधीची वाफ या कार्यास अधिकच प्रभावशाली बनविते. अग्नीमध्ये जळलेले पदार्थ कोट्यवधी पटीने अधिक सूक्ष्म बनून वातावरणात विखुरले जातात आणि कित्येक किलोमीटर पर्यंतच्या क्षेत्रात आपला प्रभाव दाखवितात. ही यज्ञाचे सूक्ष्म तत्वे घातक रोग जंतूंनाच नष्ट करीत नाही, तर प्रदूषण पसरवणाऱ्या कणांना देखील नष्ट करते. हीच अणूतत्वे पर्जन्यासोबत जमिनीत जातात व तेथेही दडून बसलेल्या हानीकारक किटाणूंना नष्ट करून व उपयुक्त कृमी-किटाणूंना पोषण देते. यामुळे जमिनीची उत्पादन क्षमता वृद्धिंगत होते. नदी, नाले व जल स्रोतांना जाऊन मिळाल्यावर यज्ञातून निघालेले लाभकारी कण त्यांनासुद्धा शुद्ध व पुष्ट करतात म्हणून हवनाची वाफ वातावरणाची शुद्धी करते, तीच जल व मृद्प्रदूषणास दूर करण्यास रामबाण उपाय आहे व त्यात कोणत्याच प्रकारच्या हानीची मुळीच शक्यता नसते.

अशा प्रकारे हल्ली मोठ्या प्रमाणात वाढत असलेल्या प्रदूषणयुगामधे यज्ञाचे महत्त्व अधिकच वाढते. आज निसर्गाचा प्रत्येक घटक भयानक प्रदूषणाच्या कचाट्यात सापडला आहे. कारखान्यांच्या धुरांड्यांमधून रात्रंदिवस बाहेर पडणारा धूर, वाहना मधून बाहेर पडणारे विषारी वायू तसेच अन्य बाबींपासून निघणारे धूर यामुळे श्वास घेण्यासाठी स्वच्छ हवा मिळणे दुरापास्त होत आहे. हवेमध्ये कार्बन, शिसे व इतर विषारी कणांचे प्रमाण एवढे वाढले आहे की हृदय रोग व अन्य गंभीर आजारांनी पीडित रुग्णांची संख्या झपाट्याने वाढत आहे. महानगरांमध्ये परिस्थिती सर्वाधिक गंभीर व चिंताजनक आहे. तेथे सकाळ पासून सायंकाळपर्यंत हवेत पसरणाऱ्या विषारी धुराच्या जीव गुदमरून टाकणाऱ्या वातावरणात निरोगी व्यक्ती देखील रोगग्रस्त होऊ

लागते. हे प्रदूषण याच वेगाने सुरू राहिले तर, चिमण्या व इतर पक्षी सकाळी चिवचिव करणे बंद करून टाकतील, कारण दूषित हवे मध्ये श्वास घेणे जड जाईल म्हणून त्यांना चुपचाप राहणेच अधिक सोईस्कर वाटेल.

यांत्रिक युगाने उत्पन्न केलेल्या या संकटामुळे हवेसोबत जल, भूमी व समस्त सृष्टीस भयावह प्रदूषणाच्या स्थितीप्रत आणून उभे केले आहे. विषारी वायूमुळे आम्लयुक्त पर्जन्यवृष्टी ठिकठिकाणी होऊन हाहाकार माजत आहे. पाण्याचा साठा भयानक प्रमाणात अशुद्ध होत आहे. भूमी आपली उत्पादन शक्ती हरवून बसत आहे. तिच्या मधून उत्पन्न होणाऱ्या वृक्ष, वनस्पती, फळफळावळे, भाजीपाला, अन्न इत्यादींची जीवनशक्ती क्षीण होत आहे. ती मानवास व अन्य प्राणिमात्रांना योग्य पोषण देण्यात अक्षम ठरत आहे. तसेच रासायनिक खते आणि किटक-नाशकांमुळे ती आरोग्यासाठी देखील घातक सिद्ध होत आहे.

संपूर्ण जगात प्रदूषणाच्या संकटास थांबविण्यासाठी कोट्यवधी रुपये खर्च होत आहेत, परंतु कोणतेच उपाय समाधान कारक सिद्ध होऊ शकले नाहीत. या संदर्भात यज्ञ हे रामबाण उपाय सिद्ध होतात. प्रदूषणाच्या समस्येचे समाधान यज्ञच करू शकतील. या विषयी बहुतेक सर्वजण खात्री बाळगून आहेत. यज्ञामध्ये प्रयुक्त केल्या जाणाऱ्या वनौषधी सुगंधित वाफेच्या रूपात विषारी धुरास नष्ट करतात व आपल्या औषधी गुणधर्मांनी मनुष्य, पशु-पक्षी व वनस्पतींना लाभ देतात. हीच यज्ञवाफ पावसासोबत पृथ्वीवर येते तेव्हा जलस्रोत व भूमीस शुद्ध करून त्यांना उचित पोषण प्रदान करते. भूमीची उत्पादकशक्ती वाढल्याने स्वतःच अन्न, फळे, भाजीपाला इत्यादी पुष्टिकारक व स्वादिष्ट बनतात.

या संदर्भात जे वैज्ञानिक संशोधन झाले ते सर्व उत्साहवर्धक निष्कर्ष प्रस्तुत करीत आहेत की हवा, जल व भूमी सहित संपूर्ण सृष्टीस प्रदूषण मुक्त करून आरोग्यवर्धक तत्त्वांनी ओतप्रोत करण्यात यज्ञांची भूमिका अद्वितीय आहे.

**यज्ञाद्वारे पर्जन्य (प्राण) वर्षा-** यज्ञाचे महत्त्व वातावरणशुद्धी व पर्यावरण-प्रदुषणाच्या समाधानापर्यंतच मर्यादित नाही. हा त्याचा भौतिक पक्ष झाला. याचा सूक्ष्म प्रभाव विशेष गुणकारी व सशक्त आहे व तो आहे- प्राण पर्जन्यवृष्टीच्या रूपात.

पर्जन्याचा अर्थ अंतरिक्षातून प्राण वर्षाव होणे हा आहे. ज्या प्रमाणे भूमीस खत-पाणी दिले तर तिची उत्पादक क्षमता वाढते, अशीच यज्ञाद्वारे वातावरणाची प्राणशक्ती वृद्धिंगत होते. प्राण हा हवेमध्ये मिसळलेला असतो. प्राणायाम करते वेळी दीर्घ श्वासासोबत संकल्पबलाद्वारे आपण याला आत ओढतो. प्रातःकालीन हवेमध्ये हे प्राणतत्त्व अधिक प्रमाणात मिसळलेले असते, त्यामुळे त्यावेळी भ्रमण केल्याने आपल्याला एक नवीनच तजेला, स्फूर्ती व शक्तीचा अनुभव येतो.

हवनामुळे जी ऊर्जा निर्माण होते, ती हवेमध्ये विद्यमान असलेल्या प्राणाच्या प्रमाणास आणखी वाढवीत असते. ही ऊर्जा फक्त एका क्षेत्रापर्यंत मर्यादित राहत नाही, तर व्यापक क्षेत्रामध्ये पसरते. जसे पाण्याच्या भांड्यात थोडे जरी तेल टाकले तरी ते त्याच्या संपूर्ण पृष्टभागावर पसरते, अगदी असाच फैलाव अंतरिक्षामध्ये हवनाद्वारे उत्पन्न झालेल्या ऊर्जेचा होतो. त्यास गोळा करून जी पर्जन्यवृष्टी होते, तिच्यामध्ये सुद्धा ही प्राणशक्ती मिसळलेली असते. ही जमिनीची मृदा, वृक्ष, अन्न, फळे, भाजीपाला या सर्वांमध्ये व्याप्त होते. या जलाने सिंचन केल्याने भूमी अधिक

पेकाऊ, उत्पादक बनते. तिथे उत्पन्न होणारे वृक्ष, वनस्पती देखील अधिक प्राणयुक्त असतात. हा प्रभाव प्रत्यक्ष पाहता येतो. याद्वारे पुष्ट झालेले गवत खाल्ल्यावर गायी अधिक दूध देतात, शिवाय ते पौष्टिकतेच्या दृष्टीने देखील अधिक गुणकारी असते. याद्वारे प्रभावित फळे व भाज्या, अन्न-धान्य इत्यादींचे सेवन केल्यास व्यक्ती अधिक निरोगी, हृष्ट-पुष्ट व दीर्घायुषी बनते, तिच्यातील बल-वीर्य आणि बुद्धी-साहसामधे वृद्धी होते.

वस्तुतः प्राणशक्ती ही संपूर्ण सृष्टीमधे समाविष्ट झालेली आहे, त्यामुळेच सृष्टीमधे सर्व प्रकारच्या क्रिया व घडामोडी होत आहेत. मनुष्य व अन्य प्राण्यांना यामुळेच प्राणी म्हटले जाते. हीच मानवामधे प्राणशक्तीच्या रूपात काम करीत असते. जर शरीरात प्राणशक्ती भरपूर प्रमाणात असेल तर व्यक्ती दुबळी व कृश दिसत असली तरी मजबूत व चिवट राहील. हिचेच दर्शन मनुष्यातील मनोबल, प्रखरता व प्रतिभेच्या रूपात होत असते. जर ही शक्ती कमी असेल तर व्यक्ती जाडजूड-लठ्ठ दिसत असुनही लुळीपांगळीच असेल. या शक्तीच्या न्यूनतेमुळे फळे, फुले, भाजीपाला व अन्न-धान्यामध्ये पौष्टिक शक्तीची कमतरता राहील. हवेत प्राणवायू कमी असला तर, त्यामुळे अपेक्षेप्रमाणे आरोग्य लाभ होणार नाही. जेथील अन्न व जल हे प्राणवायूच्या दृष्टीने कमकुवत असते, तेथील लोक दुर्बल असल्याचे दिसतात. खरे तर हा सर्व अंतरिक्षातील प्राणऊर्जेच्या कमतरतेचाच परिणाम असतो. यज्ञ ही उणीव भरून काढतात.

यज्ञाद्वारे उत्पन्न झालेली ऊर्जा प्राणशक्तीच्या रूपात वातावरणात व्यापक रूपात पसरून त्यास उत्पादनक्षम बनविते. गीतेमध्ये याच पर्जन्यवृष्टीविषयी म्हटले आहे की जी आकाशामधून

खाली येते आणि समस्त प्राणिमात्रांचे पोषण करते, ही पर्जन्यवृष्टी पृथ्वी व तिच्या प्राण्यांमध्ये नवीन प्राणशक्ती आणि उल्हासाचा संचार करते.

**यज्ञाद्वारे देवशक्तींची प्रसन्नता आणि सृष्टी संतुलन-** देवता या सृष्टीचे संचालन करणाऱ्या परमेश्वराच्या शक्ती होत. यांचा संपूर्ण विश्वाच्या समस्यांशी तसेच मनुष्याच्या वैयक्तिक जीवनातील सुख-समृद्धी, हानी-लाभ, रोग-शोक इत्यादींशी घनिष्ट संबंध असतो. या देवशक्तींची अनुकूलता अर्थात प्रसन्नता असली तर अगदी सहजपणे उन्नतीची दारे उघडली जातात आणि या देवता प्रतिकूल वा रुष्ट झाल्यास कठोर परिश्रम देखील निष्फळ ठरतात. यांना अनुकूल करून घेण्यासाठी जे काही उपाय आहेत, त्या सर्वांमध्ये यज्ञ हा सर्वश्रेष्ठ आहे. यज्ञामुळे देवशक्ती प्रसन्न होतात.

मत्स्यपुराणात लिहिले आहे- यज्ञामुळे देवता शक्तिसंपन्न आहेत व त्यामुळेच त्या विजयी होतात. देवांच्या अधीन सर्व प्राणिमात्र आहेत, प्रजा आहे आणि यज्ञाधीन सर्व देवता आहेत. यज्ञच भगवान विष्णू आहेत व त्यांच्यातच सर्व काही प्रतिष्ठित आहे. यातच वर्णन आहे की कमलनयन भगवान विष्णू यज्ञामुळे प्रसन्न होतात. ते संतुष्ट झाल्यावर जग प्रसन्न होते. शिवपुराणात उल्लेख आहे की शिवास प्रसन्न करण्याचे यज्ञच सर्वश्रेष्ठ साधन आहे. यास्तव हे ऋषीगण हो! तुम्ही सर्व मिळून पृथ्वीवर एक विशाल यज्ञ करा. कल्की पुराणामध्ये म्हटले आहे- यज्ञाने देवता संतुष्ट होतात. यज्ञांनीच संपूर्ण विश्व प्रतिष्ठित आहे, टिकून आहे. पृथ्वी माता यज्ञाने धारण केलेली आहे. यज्ञच प्रजेस तारतो. शतपथ ब्राह्मण ग्रंथात यज्ञास देवांचे दिव्य भोजन असे म्हटले आहे. देवता जे काही कार्य करतात, यज्ञामुळेच ते कार्य करण्यास समर्थ बनतात.

गीतेमध्ये भगवान कृष्ण म्हणतात- "देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।" अर्थात् तुम्ही सर्व यज्ञीय कार्यांनी देवतांना प्रसन्न करा. दैवता प्रसन्न होऊन आपल्या अनुग्रहांचा वर्षाव करतील.

देवतांच्या अनुकूलतेचा मनुष्याच्या सुख-शांतीशी सृष्टिसंतुलनापेक्षाही अधिक जवळचा संबंध आहे. सृष्टी ही देवशक्तींची क्रीडाभूमी आहे. त्यांच्या अनुग्रह अनुदानांमुळेच विश्व-ब्रह्मांडाची क्रिया-कृत्ये, घडामोडी, समतोल व व्यवस्था-संपन्न होत आहे. विभिन्न देवशक्तींचे दर्शन प्रत्यक्ष रूपात आपणास नैसर्गिक हालचाली व घडामोडींच्या रूपात होत असते.

पुराणादी ग्रंथांमध्ये यांचेच अलंकारिक वर्णन आहे की देवता मनुष्याच्या यज्ञा सारख्या श्रेष्ठ कर्मांनी प्रसन्न होऊन अनुदानांची लयलूट करतात. देवतांचा अनुग्रह प्राप्त करण्यासाठी त्यांना प्रसन्न ठेवावे लागते. प्रसन्न करण्याचा अर्थ त्यांना भेट वस्तू वा प्रसाद देणे हा नव्हे, कारण त्यांना यांची आवश्यकता नसते. देवी-देवता सूक्ष्म शक्ती आहेत, त्या स्थूल वस्तूंचे काय करतील? आणि या शक्ती केवळ पूजा-पाठ, अनुनय-विनय यांनी प्रसन्न होत नाहीत. यांचा आशीर्वाद तर मानवीय मर्यादांच्या नियमांचे पालन करून व आदर्शांच्या मार्गावर अग्रेसर होऊनच प्राप्त केला जाऊ शकतो. असे जीवन जगण्याचे नावच यज्ञ आहे. यामध्ये देवशक्तींचे आवाहन, पूजन व सन्मान केला जातो. सोबतच यज्ञीय आदर्शानुरूप चालण्याचा, जगण्याचा दृढ संकल्प केला जातो.

यज्ञीय आदर्शांचा अंगीकार न केल्यानेच आपण देवशक्तींचे उचित पोषण करू शकत नाही, परिणामी त्यांच्या अनुग्रहांपासून वंचित राहतो; उलट त्यांच्या रोषास बळी पडतो. गेल्या काही दशकांपासून वाढत असलेल्या निसर्ग-प्रकोपांना व बिघडत

असलेल्या पर्यावरणाच्या समतोलास याच रूपात मानावे लागेल. वायू पुराणामध्ये याच संदर्भात उल्लेख आहे की जल, वायू, अग्नी इत्यादी भूतांवर देवशक्तींचे नीट नियंत्रण न राहिल्यामुळे अतिवृष्टी, अनावृष्टी, महापूर, प्रचंड वादळे, वाढते उष्णतामान, भयंकर आजार इत्यादी प्रजेस संतप्त करणाऱ्या भीषण आपदा सदोदित भेडसावीत असतात. निरुक्त ग्रंथामध्ये वर्णन आहे की यज्ञ-हवनाद्वारे देवशक्ती पुष्ट होतात, त्यामुळे त्या जल शक्ती, अग्नी शक्ती इत्यादींना नियंत्रणात ठेवतात च प्रजेस नष्ट होऊ देत नाहीत. ऋषी मार्कंडेय म्हणतात- "यज्ञांच्या अभावी देवांच्या अन्नाचा क्षय होतो. मग मेघ नष्ट झाल्यामुळे पर्जन्यवृष्टी होणे बंद होऊन जाते. पर्जन्यवृष्टीच्या अभावामुळे मनुष्याला भोजन दुर्लभ होऊन, परिणामी सर्व मनुष्य व प्राणी दुष्काळग्रस्त होऊन मृत्युमुखी पडू लागतात."

आज मनुष्य यज्ञीय जीवन जगणे विसरूनच गेला आहे. त्याचे आचरण व्यवहार पशू व पिशाच्चवत झाले आहे. चिंतनात भयंकर भ्रष्टता व स्वभावात राक्षसी दुष्टता व्याप्त झाली आहे. या स्थितीत देवशक्तींचा आदर-सत्कार व पोषण तर दूर, तो निसर्गाला बळेच लुबाडून त्याचे निर्मम दोहन-शोषण करण्यास उद्युक्त झाला आहे. यामुळेच देवशक्तींचा आक्रोश व रोष नैसर्गिक प्रकोपांच्या रूपात कोसळत असल्याचे प्रत्यक्षात दिसत आहे. भूस्खलन, भूकंप, ढग फुटी, महापूर, दुष्काळ, आम्लयुक्त पर्जन्यवृष्टी, चक्रीवादळे इत्यादींच्या रूपात यांचा कोप स्पष्ट दिसतो.

बिघडलेल्या सृष्टिसंतुलनाचा उपचार वर वर सुरू आहे. त्यामुळे अपेक्षित परिणाम होत नाहीत, उलट नैसर्गिक प्रकोपांद्वारे विनाशलीलेच्या घटना वाढतच आहेत. याचे समाधान सृष्टीच्या पाठीशी दडलेल्या सक्रिय देवशक्तीच्या प्रसन्नतेत लपलेले आहे.

आणि हे यज्ञ-कर्माद्वारेच शक्य आहे. मानवाला आपली दुर्बुद्धी व दुष्कर्मांच्या मार्गाचा त्याग करून यज्ञीय आदर्शांचा अंगीकार करीत सत्कर्मांच्या मार्गाने वाटचाल करावी लागेल.

**यज्ञाद्वारे ऋण आयन वृद्धी आणि आरोग्य लाभ-** जिथे नित्य यज्ञ होतात, तेथील वातावरणात राहण्यामुळे सहजच आरोग्य- लाभ होतो. असे का होते? याचे कारण वैज्ञानिक शोध-निष्कर्षांद्वारे स्पष्ट झाले आहे. त्यांच्यानुसार, ज्या वातावरणामध्ये ऋण आयनांची संख्या अधिक असते, तेथे आरोग्य लाभ शीघ्र होतो.

आपल्या चहूकडे हवेचा विशाल समुद्र पसरलेला आहे व त्यामध्ये आपण सर्व श्वास घेत असतो. आपल्या श्वासामध्ये केवळ प्राणवायूच असणे पुरेसे नसते, तर याच्या धूलीकणांवर ऋण आवेश पण असायला हवा. हवेमधील सूक्ष्म धूली कणांना आयन म्हणतात. जेथील हवेमध्ये धन आवेशयुक्त कण अधिक असतात, तेथील वातावरण आरोग्यासाठी हानीकारक मानले जाते. काही कारणास्तव, एखाद्या ठिकाणी यांची संख्या वाढू लागली तर, निरोगी व्यक्तीचे आरोग्य ढासळू लागते. दाट वस्तीच्या, गर्दी युक्त, प्रदूषण युक्त शहरी भागात व औद्योगिक क्षेत्रांमध्ये यामुळेच निरोगी व्यक्ती देखील अस्वस्थता अनुभवू लागते. रूग्णास तेथे सर्व सुख-सोयी, साधने व उपचार उपलब्ध असूनही त्याला निरोगी-ठणठणीत व्हायला प्रदीर्घ कालावधी लागतो.

या उलट ऋण आयन असलेली हवा आरोग्यासाठी अतिशय लाभकारक असते. पाण्याच्या धबधब्या जवळ, समुद्र किनाऱ्यावर, वन-पर्वत व ग्रामीण क्षेत्रांमध्ये जो शीघ्र आरोग्यलाभ होतो, तो याच कारणामुळे होत असतो. म्हणूनच लोक हवापालट

करण्यासाठी या ठिकाणी पर्यटनार्थ जातात. अलीकडे याच आधारे "आयनिक थेरपी"चे प्रचलन सुरू झाले आहे, परंतु हा प्रयोग वैयक्तिक, कौटुंबिक आणि लघू स्तरापुरताच मर्यादित आहे. कारण तो खूप महागडा आहे. याचा लाभ जर व्यापक प्रमाणात पोहचवायचा असेल, तर उपचार विराट व प्रभावशाली असायला हवा. तसेच तो स्वस्त व सोपा सुलभ देखील असला पाहिजे. ऋषींनी आपल्या सूक्ष्म वैज्ञानिक प्रयोगांद्वारे अग्निहोत्र- यज्ञाच्या रूपात या वैशिष्ट्यपूर्ण उपचारपद्धतीस शोधून काढले होते.

आतापावेतो यास केवळ एक धार्मिक कर्मकांडच मानले जात असे. परंतु जेव्हा पासून विज्ञानाचे लक्ष्य ऋषींच्या या अद्भुत देणगीवर गेले, तेव्हा पासून यातील नवनवीन रहस्ये स्पष्ट होत आहेत. त्यापैकी एक आहे आरोग्यदायक ऋण-आयनाचे उत्पादन. जिथे नियमितपणे यज्ञ होतात, तेथे ऋण आयनांची संख्या भरपूर असते. तेथे त्यांची उपस्थिती २०० ते ४०० आयन प्रती सें.मी.च्या प्रमाणात आढळून आली आहे. हे प्रमाण समुद्रतट व पर्वतीय वन्यक्षेत्री आढळून येते.

**सर्वांगीण चिकित्सा पद्धतीच्या रूपात यज्ञ-** यज्ञ केवळ वातावरणच शुद्ध करून आरोग्यवर्धक आयनांमध्येच वृद्धी करीत नाही, तर याचा योग्य रीतीने उपयोग केल्यास, हा स्वतःच एक अप्रतिम चिकित्सापद्धती म्हणून सिद्ध होतो. औषधी गुणधर्मांनी युक्त हवन सामग्रीने केलेला यज्ञ एका समग्र चिकित्सेच्या रूपात लाभ देतो, ज्यायोगे शारीरिक आणि मानसिक रोगांचा यशस्वी इलाज केला जाऊ शकतो. शिवाय हा सर्व प्रकारच्या हानीकारक दुष्प्रभावांपासून पूर्णपणे सुरक्षित आहे. पूज्य गुरुदेवांनी यास **यज्ञोपॅथी** असे म्हटले आहे. ब्रह्मवर्चस संशोधन केंद्र, शांतिकुंज,

हरिद्वार येथे या अभिनव चिकित्सा पद्धतीला आणखी जास्त विकसित केले जात आहे. याच्या प्रभावाचे स्वतंत्र आणि आगळे-वेगळे विज्ञान आहे-

**सूक्ष्मीकरणाची शक्ती-** यामध्ये वापरल्या जाणाऱ्या औषधी सूक्ष्मीकरणाच्या आधारावर कार्य करतात. एक सामान्य नियम आहे की औषधे घन रूपात जेवढा परिणाम-प्रभाव उत्पन्न करतात, त्यापेक्षा इंजेक्शनाद्वारे द्रव रूपात अधिक लवकर आणि गहन प्रभाव टाकतात. विशेषतः वायू रूपात तर या औषधी खूपच लवकर व खोलवर प्रभावशाली सिद्ध होतात. सूक्ष्मीकरणाद्वारे यांची शक्ती वाढते. प्रत्यक्ष नुसता बदाम खाण्यापेक्षा बारीक वाटून खाण्याने अधिक लाभ होतो.

बाब अगदी साधी-सरळ आहे की वस्तू जेवढी बारीक-सूक्ष्म होत जाते, तेवढी तिची शक्ती वाढत जाते. पोळीच्या तुकड्यास बारीक न चावता तसेच गिळले तर तो लाभ होणार नाही, जो त्यास खूप चावून चावून बारीक व पातळ करून खाल्ल्याने होतो. सोन्याचा वा चांदीचा तुकडा एखाद्यास खाऊ घातला तर, फायद्या ऐवजी नुकसान होण्याचीच दाट शक्यता असते. या उलट त्यांचे भस्म अल्प प्रमाणात खाऊ घातले तर ते रोगनाशक व शक्तिवर्धक सिद्ध होते. आयुर्वेदिक औषधे या आधारेच काम करतात त्यांना जेवढे बारीक कुटल्या-वाटल्या जाते, जेवढे जास्त घोटले जाते, ते तेवढेच जास्त गुणकारी सिद्ध होतात. होम्योपॅथिक औषधे देखील याच सिद्धांतावर टिकून आहेत. यामध्ये औषधांची सूक्ष्मता वाढवून त्यांच्या 'पोटेन्सी' मध्ये वृद्धी केली जाते. ॲलोपॅथीमधे इंजेक्शनेसुद्धा याचआधारे लाभदायक ठरतात. ती रक्तात पोहचताच संपूर्ण शरीरात पसरण्यास त्यांना वेळ लागत नाही. यज्ञाग्नीमध्ये

अर्पित हवन सामग्री स्थूल स्वरूपातून वायुरूपामधे परिवर्तित होते. त्यामुळे तिची शक्ती आणि उपयोगिता खूपच जास्त प्रमाणात वाढते. पदार्थाची सूक्ष्म रूपात शक्ती किती व कशी वाढते हे पुढील उदाहरणावरून नीट लक्षात येईल. एक लहानशी मिर्ची पाण्याच्या घोटाबरोबर गिळून घेतली तर काही जाणवणार नाही. पण तिचे बारीक बारीक तुकडे करून जिभेवर ठेवल्यास खून तिखट वाटेल. ती जर बारीक वाटून खाल्ली तर बराच त्रास होईल. पण तीच मिर्ची विस्तवात टाकली तर जवळपासच्या लोकांना शिंका, खोकला येऊन डोळ्यातून अश्रूधारा वाहू लागतील, जीव गुदमरून जाईल. हा सर्व सूक्ष्मीकरणाचाच प्रभाव असतो. अशा प्रकारे यज्ञाद्वारे ग्रहण केलेल्या औषधी अन्य प्रकारांपेक्षा अधिक परिणामकारक व प्रभावी सिद्ध होतात.

तोंडावाटे घेतलेली औषधी प्रथम आमाशयात जाते, तेथे व्यक्तीच्या पचन क्षमतेनुसारच तिचा एक अंश रक्तात मिसळतो, बाकी मल-मूत्रादीद्वारे बाहेर निघून जातो. अशा प्रकारे औषधांचा काही अंशच आपला प्रभाव दाखवू शकतो आणि पचन संस्था कमकुवत झाली असेल, तर त्या औषधीचा लाभ आणखी कमी प्रमाणात मिळतो. इंजेक्शनाद्वारे दिलेल्या औषधींचा प्रभाव निश्चितपणे अधिक व शीघ्र होतो. परंतु हे निश्चित नसते की त्या शरीराच्या सूक्ष्म अंशापर्यंत पोहचतीलच. रक्ताल्पता, प्रतिक्रिया वा अन्य अडसर यामुळे आशाजनक लाभ मिळत नाही. या उलट हवनाद्वारे विषेश हवनीय औषधी श्वासमार्गातून त्वचेच्या सूक्ष्म छिद्रांमध्ये प्रवेश करतात. त्या श्वासाद्वारे व रक्तामध्ये जाऊन संपूर्ण शरीरावर त्वरित आपला प्रभाव दाखवितात. शरीरात आहार पोहचविण्याची व कुचकामी विजातीय द्रव्ये व तत्त्वे निष्कासित

करण्याची जेवढी काही माध्यमे आहेत, त्या सर्वांमध्ये श्वसन क्रिया सर्वात महत्त्वपूर्ण व शक्तिशाली आहे. आपण मुखावाटे अन्न-जल ग्रहण करतो आणि कुचकामी घाण-कचऱ्यास मल-मूत्र व अन्य छिद्रांवाटे बाहेर टाकतो. या उलट श्वासावाटे आपण अन्न-जलापेक्षाही महत्त्वपूर्ण व सूक्ष्म आहार ग्रहण करीत असतो. प्राणवायूच्या फायद्यांशी सर्वच जण परिचित आहेत. श्वसनाद्वारे प्राणवायू आपण याच माध्यमातून ग्रहण करीत असतो. अन्न-पाण्याविना आपण काही दिवस तरी जिवंत राहू शकतो, परंतु काही मिनिटे श्वास बंद पडला, तर आपली जीवनलीला समाप्त होईल. अत्यधिक सूक्ष्म व उपयुक्त आहार शरीराच्या कणा-कणांपर्यंत पोहचविण्यात एकटे श्वसन तंत्र जेवढे काम करते, तेवढे ग्रहण करणारे व पचविणारे शरीराचे संपूर्ण तंत्र मिळून देखील करू शकत नाही. यज्ञामध्ये हवनाद्वारे वायुभूत झालेल्या औषधी याच श्वसन तंत्राद्वारे शरीराच्या कणा-कणापर्यंत पोहचून आपला पुरेपूर प्रभाव दाखवितात.

**ॲलोपॅथीच्या हानीकारक प्रभावापासून मुक्त यज्ञ-चिकित्सा-** प्रचलित औषधींची मुख्यतः दोनच वैशिष्ट्ये असतात. १- उत्तेजना उत्पन्न करणे. २- रोग जंतूंना व त्या सोबतच उपयुक्त तत्त्वांना सरळ-सरळ नष्ट करून टाकण्याची क्रिया. या दोन्ही बाबी रोग्याच्या समस्येचा योग्य प्रकारे उपचार करण्याऐवजी त्यास अधिक दुर्बल व रुग्ण बनवितात.

ॲलोपॅथिक औषधे उत्तेजना उत्पन्न करून तात्काळ शक्ती वाढविण्याचा भ्रम उत्पन्न करतात. पण शेवटी त्या हानीकारकच सिद्ध होतात. हे आजारी व अशक्त सैनिकांना उत्तेजक पदार्थ खाऊ घालून मोर्चावर युद्धासाठी पाठविण्यासारखे आहे. असे

सैनिक आवेशात येऊन पराक्रम तर दाखवितात व अगोदरच रिक्त झालेल्या शक्ती भांडारास उत्तेजनेमध्ये अत्यधिक प्रमाणात खर्च करून टाकतात. आवेश उतरताच अशक्तपणा पूर्वीपेक्षाही अधिक वाढतो. शक्ती वाढविण्याच्या नावाखाली अशी टॉनिके सुद्धा शेवटी हानीकारकच सिद्ध होतात.

दुसरीकडे तीव्र मारक क्षमतेच्या अँटीबायोटिक औषधी देखील तात्पुरता आराम देऊन शेवटी घातकच सिद्ध होतात. यांचे एकच कार्य असते व ते म्हणजे-आक्रमण. रोगांचे किटाणू नष्ट करण्यासाठी यांचा उपयोग केला जातो, परंतु या शत्रू-मित्र हा भेदभाव न करता जीवन रक्षक जीवाणूंवर देखील आपला हल्ला करतात. यामुळे विषाणूसोबतच जीवनरक्षक जीवाणूसुद्धा मोठ्या संख्येत मारले जातात. अशा प्रकारे जीवनशक्तीचा फारच झपाट्याने क्षय होतो. औषधींचा उपयोग प्रदीर्घ काळापर्यंत करावा लागला, तर त्यांच्या दुष्परिणामांची कल्पना सुद्धा करता येत नाही. अशातच अशक्तपणा वाढत जातो व शरीर रोगांचा अड्डा बनत जाते.

एवढे भयंकर दुष्परिणाम असल्यावरही नाइलाजास्तव आपल्याला या औषधींचा उपयोग करावा लागतो. प्राचीन ऋषी-मुनींनी या संदर्भात यज्ञरूपात एक उच्च दर्जाची चिकित्सा पद्धती प्रदान केली होती. या उपचार पद्धतीमध्ये शक्तिवर्धन करण्याचा आणि रोगाणू-विषाणू मारण्याचा उद्देश एकाच वेळी चांगल्या प्रकारे पूर्ण होतो. तसेच ही यज्ञोपचार पद्धती अशा सर्व हानीकारक परिणामांपासून सुद्धा मुक्त आहे, जे आज प्रचलित ॲलोपॅथिक औषधांशी निगडित आहेत.

**मानसिक उपचाराच्या रूपात यज्ञ चिकित्सा-** वायुशुद्धी, आरोग्य लाभ या सारख्या भौतिक आणि शारीरिक उपचारांच्याही

पुढे यज्ञ आपला प्रभाव दाखवितात. शारीरिक आजारांपुढे मानसिक रोगांचे विस्तृत क्षेत्र येते, ज्यामुळे आजचा मानव भयंकररीत्या पीडित आहे. खरे तर त्याच्या ९० टक्के शारीरिक आजारांची मुळे मनाच्या खोल कप्प्यात दडलेली आहेत. संशय, लहरीपणा, आवेश, उद्वेग, द्विधा मनःस्थिती, अविश्वास, भ्रम, तणाव या सारखे कितीतरी विकार मनास त्रस्त-ग्रस्त करीत अर्धवट वेड्यागत अर्धे-अधुरे जीवन जगण्यासाठी भाग पाडतात. ही स्थिती शारीरिक पीडेपेक्षाही अधिक जास्त कष्ट-कारक व त्रासदायक असते. दारिद्र्य, मागासलेपणा, अपयश, अपेक्षा व तिरस्कार इत्यादींच्या मुळाशी मानसिक रुग्णताच काम करीत असते. यांच्या उपचाराची आजच्या चिकित्सा पद्धतीमध्ये कोणतीच खात्रीची व प्रभावी उपाय-योजना नाही. अनिद्रा व डोके-दुखीसारख्या रोगांमध्ये झोपेची गोळी, वेदना शामक किंवा बेशुद्ध करणाऱ्या औषधांचा जादू सारखा इलाज सुरू आहे. मानसिक रोगांमध्ये कार्बनडाय ऑक्साइडचा प्रयोग, वेडेपणात विद्युत झटके, यासारखे प्रयत्न सुरू आहेत. असा कोणताच उपचार दिसून येत नाही, जो मनोविकारांचे शमन करण्यात आशाजनक सिद्ध होईल. या दुर्भाग्यपूर्ण स्थितीमध्ये यज्ञचिकित्सा एक प्रकाश किरण म्हणून समोर येत आहे.

यज्ञात औषधीच्या सूक्ष्म अंशास श्वासाद्वारे आंत खेचताच तो सर्वप्रथम मेंदूवर आपला प्रभाव पाडतो, त्यानंतर तो फुफ्फुसांमध्ये व नंतर शरीराच्या सर्व लहान-मोठ्या भागांवर आपला प्रभाव दाखवितो. तसेच तो मानसिक रोगांमध्ये अद्भुत लाभ पोहचवितो. डोकेदुखी, अनिद्रा, अर्ध डोके दुखी, सर्दी पडसे, मंदबुद्धी, लहरीपणा, आवेश इत्यादींमध्ये हा आपला विशेष परिणाम दाखवितो. खरे तर मनोविकाराचे शमन करण्यात यज्ञाग्नी आणि मंत्रशक्तीद्वारे

उत्पन्न ऊर्जा आपला विशेष प्रभाव टाकते.

यज्ञचिकित्सेमध्ये मंत्रांच्या शक्तीचा प्रभाव वस्तुतः स्वरशास्त्र व ध्वनी-विज्ञानाच्या रहस्यमय आधारांवर काम करतो. एका स्वरात उच्चारण केलेल्या मंत्रांच्या शक्तीस शब्द-शक्तीच्या प्रभावाच्या सामान्य उदाहरणांद्वारे सुद्धा समजून घेता येईल. पुला वरून मार्चिंग करीत जाण्याची सैनिकांना मनाई केली जाते, कारण एका वेळी एकाच तालबद्ध कदम चालीने उत्पन्न होणाऱ्या ध्वनी कंपनांच्या संयुक्त शक्तीमुळे पूल तुटू शकतो. ध्वनीच्या निश्चित गतीमुळे काचेचा प्याला फुटणे व किल्ले-पर्वत पाडण्याची बाब याच प्रकारच्या ध्वनी शक्तीची उदाहरणे आहेत. स्फोटाच्या भयंकर आवाजामुळे हृदय बंद पडू शकते तसेच गर्भपात देखील होऊ शकतो. शंख-ध्वनीच्या ध्वनीच्यामार्गात येणारे किटाणू मरून नष्ट होतात. युद्धभूमीमध्ये बिगुल ध्वनी व युद्ध-गीतांनी "करा अथवा मरा", "जिंकू किंवा मरू" हा जोश उत्पन्न होतो. खरे तर मंत्र हे सामान्य ध्वनीपेक्षा कितीतरी जास्त गहन स्वरूपात कार्य करतात. यांचा भौतिक ध्वनीव्यतिरिक्त सूक्ष्म चैतन्यपक्ष देखील प्रखर असतो, जो उच्चारणकर्त्याच्या शुद्ध अंतःकरण व संकल्पाद्वारे जागृत होतो. शाप-वरदानामध्ये मंत्रशक्तीचा प्रयोग याच बळावर काम करतो. प्राचीन काळची युद्धे सुद्धा मंत्रप्रयोगांसह लढली जात असत.

मंत्रांच्या प्रभावास अधिक शक्तिशाली बनविण्यात यज्ञ ऊर्जा आपली विशेष भूमिका बजावते. विज्ञानामध्ये उष्णता, ध्वनी आणि प्रकाश हे शक्तीचे तीन मूलभूत घटक आहेत. यापैकी उष्णता व प्रकाशाची गती ध्वनीपेक्षा खूप जास्त आहे. यज्ञामध्ये मंत्रशक्तीसोबत उष्णता व प्रकाशास जोडले जाते, ज्यायोगे ती

शक्तिशाली बनून आणखी व्यापक क्षेत्रामध्ये पसरावी व तिने आपला प्रभाव दाखवावा. मनुष्याचा सौम्य आवाज विद्युतशक्ति बरोबर जुळल्यावर लाऊडस्पीकरद्वारे लाखो लोकांपर्यंत पोहचतो. अशाच प्रकारे रेडिओ व बिनतारी यंत्राद्वारे एका व्यक्तीचा आवाज विद्युत चुंबकीय लहरीच्या रूपाने कितीतरी दूर कुठे-कुठे व किती विशाल क्षेत्रामध्ये पोहचत असतो. दूरदर्शन (T.V.) मध्ये तर शद्बच नव्हे तर चित्रे सुद्धा दूरवर पोहचविली जातात. याच प्रकारे मंत्रशक्तीस दूर पोहचविण्यात यज्ञाग्नीची ऊर्जा 'एम्प्लीफायर' आणि 'ट्रान्समिटरचे' काम करते. शुद्ध वाणीतून उत्पन्न मंत्रशक्ती यज्ञामध्ये उपस्थित असलेल्या व्यक्तींवर शद्बवेधी बाणाप्रमाणे आपला प्रभाव पाडते आणि व्यक्तीस आतून प्रभावित करते. अवतीभोवतीच्या वातावरणात सुद्धा खूप दूरपर्यंत दिव्यतरंग सात्त्विक व शांत प्रभाव उत्पन्न करतो. खरे तर यज्ञामध्ये मंत्रशक्ती, यज्ञऊर्जा व व्यक्तींच्या संकल्प-सद्भावनांच्या सामूहिक शक्तीशी संयुक्त होऊन एक अशी तेजस्वी होते, जी भाग घेणाऱ्या व्यक्तींच्या मनामध्ये खोलवर आपला प्रभाव पाडते. तेथील कुसंस्कार व पाप-तापांना जाळून अनुकूल, सात्विक मनोभूमी निर्माण करते. खोलवर झालेल्या व्यापक परिवर्तनामुळे मनोभूमीतही व्यापक फेरबदल होतो. दुर्गुण, दुष्कर्मे व दुर्बुद्धी दूर होऊन मनोविकारांचे शमन होऊ लागते. काम, क्रोध, ईर्ष्या, द्वेष, आळस, आवेश, संशय, भय या सारखे मानसिक उद्वेग शांत होऊ लागतात. याप्रमाणे यज्ञ-चिकित्सेचा उपयोग मानसिक उपचारामध्ये अनुभवी व्यक्तींद्वारे यशस्वीपणे केला जाऊ शकतो.

**वातावरण प्रदूषणाचा उपचार-यज्ञ-** आज विविध प्रकारच्या प्रदूषणाने संपूर्ण पर्यावरणास दूषित केले आहे. हे विश्वव्यापी संकटाचे रूप घेऊन संपूर्ण मानव जातीसाठी एक भयानक आव्हान आहे.

वस्तुतः मनुष्यजातीच्या संकटाचे खरे कारण आणखीच गहन आहे व ते आहे वातावरणातील वैचारिक प्रदूषण.

जल, वायू व निसर्गाचे अन्य घटक मिळून पर्यावरण बनते, तसेच वातावरण हे मनुष्य-विचार व कृत्यांनी बनत असते. ते चांगलेही असू शकते आणि वाईटही असू शकते. जेथे चिंतन श्रेष्ठ व आचरण-व्यवहार उदार आहेत, जिथे चांगल्या व समजुतदार लोकांचे बाहुल्य आहे, तेथील वातावरणामधे स्वाभाविकच एक गंभीर शांती व सात्त्विकता असते. या उलट जेथे चिंतन क्षुद्र, निकृष्ट व बिघडलेले असते, आचरण-व्यवहारात भ्रष्टता व दुष्टता असते, तेथे अशांत व गुदमरलेले वातावरण असते.

व्यक्तींच्या चिंतन व व्यवहारांच्या संमिश्रित प्रभावाने वातावरण विनिर्मित होते. वातावरणाच्या या विचार-प्रवाहालाच युग म्हटले जाते. प्राचीनकाळी लोकांचे श्रेष्ठ विचार, भाव व सात्त्विक-आदर्श रीती-नीतीद्वारे बनलेल्या युगास सत्ययुग म्हटले आहे. असेच कलियुग हे काही आकाशातून पडले नाही, हा लोकांच्या स्वार्थ, संकुचितपणा व दुष्टपणाने भरलेल्या विचारप्रवाहाचा परिणाम आहे. वायुमंडळास जर काया समजले तर वातावरणास चेतना वा मन म्हणता येईल. वायूमंडळरूपी कायेचे संकट वातावरणरूपी मनाच्या मनमानीमुळे, उच्छृंखलतेमुळे उद्‌भवले आहे. जोपर्यंत यास प्रभावित केले जाणार नाही, तोपर्यंत आजच्या समस्या व परिस्थिती यथावतच राहील.

म्हणूनच आजचे मुख्य कार्य सूक्ष्म वातावरणाची निर्मिती करणे हे आहे. वायुशुद्धीसाठी सुरू असलेले स्थूल प्रयत्न आपल्या परीने चालत राहावेत. ते योग्यच आहेत. परंतु वातावरणाची शुद्धी ही त्यापेक्षा कितीतरी अधिक महत्त्वपूर्ण आहे. सूक्ष्मदर्शी ऋषी

भौतिक वायुमंडळ व पर्यावरणापेक्षा जास्त चिंता सूक्ष्म वातावरणाची करीत असते विचार प्रवाह हा बाह्य वाद्ळांपेक्षा अधिक प्रचंड असतो, हे ते जाणत होते जेव्हा युद्ध, उन्मादाची लाट उसळते, तेव्हा प्रत्येकजण लढाईबाबत उत्साह व आवेश युक्त दिसून येतो. जेव्हा विलासीपणाची लाट उसळते, तेव्हा सर्वत्र राग-रंग, फॅशन-व्यसनाचीच दृश्ये नजरेस पडतात. अलीकडच्या काळात व्यक्तिवादी संकीर्णता व भोगवादाचा रंग व नशा प्रत्येकाला नाचवत आहे, झुलवत आहे. या साठी आपली समजच नव्हे तर वातावरणाचा प्रभावच मुख्यत्वेकरून कारणीभूत ठरतो. गतकाळात रशिया व जर्मनीच्या सत्ताधाऱ्यांनी आपापल्या देशात आपल्या रुचीचे अनुकूल वातावरण विनिर्मित केले होते. परिणामी लोकांची रुची सुद्धा तशीच झाली. त्यांचे प्रयत्न स्थूल होते, जे प्रामुख्याने प्रचार, प्रलोभन वा दबाव तंत्रावर आधारित होते. पण जर वातावरणामध्ये श्रेष्ठत्व भरायचे असेल, तर उपचार आध्यात्मिक दर्जाचेच करावे लागतात. ऋषींनी या उद्देशाने यज्ञास सर्वाधिक उपयुक्त मानले आहे.

जेव्हा शक्तिशाली मंत्रांचे सस्वर उच्चार करून योग्य समिधा व हवन सामग्रीने यज्ञ केला तर त्याचा दिव्य प्रभाव आकाशमंडळामध्ये पसरतो. याच्या प्रभावामुळे लोकांच्या अंतःकरणात सद्भाव, सहयोग, संयम, सदाचार आस्तिकता व सेवाभावासारखे उच्चभाव आणि विचार उसळू लागतात. यज्ञामुळे अदृश्य जगतात जे आध्यात्मिकविद्युततरंग पसरतात, ते लोकांच्या मनातील वासना, स्वार्थीपणा, द्वेष, अनीती, पाप, कुटिलपणा या सारख्या वाईट बाबी नष्ट करतात. त्यामुळे कित्येक प्रकारच्या समस्या आपोआप दूर होतात. अनेक गुंतागुंती, चिंता, भय, शंका व वाईट संभावना समूळ नष्ट होतात.

प्राचीन काळी राजे, धनाढ्य व्यक्ती, सामान्य जन आणि ऋषी-मुनी मोठे-मोठे यज्ञ करीत असत. त्यामुळे वातावरण शुद्ध, निर्मळ व सात्त्विक बनत असे. परिणामी समाज व देशामध्ये पसरलेल्या वाईट बाबी, दुष्प्रवृत्ती, दुराचार व समस्यांचे निवारण होत असे. वेळोवेळी अनुकूल वातावरण निर्मितीसाठी व वातावरणातील दूषित तत्त्वे नष्ट करण्यासाठी विराट यज्ञांचे आयोजन केले जात असे. ऐतिहासिक घटनाक्रम या सत्याचे साक्षी आहेत.

**वातावरण शुद्धीसाठी ऐतिहासिक यज्ञ ही आजच्या काळाची अनिवार्य गरज-** जेव्हा रावणाच्या आसुरीवृत्तीमुळे दहशतीचे वातावरण बनू लागले होते, तेव्हा त्यास शुद्ध करण्यासाठी गायत्री महामंत्राचे द्रष्टे महर्षी विश्वामित्रांनी व्यापक यज्ञायोजने सुरू केली होती. या कार्यामध्ये असुरांकडून उत्पन्न केली जाणारी विघ्ने व विध्वंसांपासून रक्षण करण्याची राम-लक्ष्मणावर जबाबदारी सोपविली होती.

नंतर यांच्या पराक्रम व पुरुषार्थाने लंकेवर विजय मिळवून रावणाचा अंत केला होता. परंतु लंका-विजयानंतरही सूक्ष्मदर्शी ऋषी पाहत होते की अजून वातावरणातील आसुरी प्रभाव नष्ट झाला नाही आणि या आसुरी शक्ती पुन्हा केव्हाही आपला आतंक पसरवू शकतात. यांना शांत करण्याचा उपचार महर्षी वसिष्ठांच्या नेतृत्वात केला गेला. सप्तऋषींच्या सहयोगाने दहा अश्वमेध यज्ञाचे आयोजन करण्यात आले होते. ऋषींच्या या सूक्ष्म प्रयासाबरोबरच लंकाविजयाचे उद्दिष्ट पूर्ण झाले. या नंतर रामराज्य स्थापनेसाठी अनुकूल परिस्थिती निर्माण झाली होती.

याच प्रसंगाची पुनरावृत्ती महाभारत काळात झाली. भगवान श्रीकृष्णाच्या सहयोगाने पांडवांनी कौरवांच्या प्रत्यक्ष

दुष्टपणाचा अंत केला होता, परंतु त्यांचे सूक्ष्म अस्तित्व बाकी होते. महाभारताच्या भयंकर युद्धात असंख्य योद्ध्यांचे तसेच प्राण्यांचे चीत्कार-आक्रोश, बीभत्स व क्रूर कृत्यांची प्रतिक्रिया अद्याप वातावरणात निनादत होती. अनेक प्रकारची संकटे उत्पन्न करणारे विनाशाचे ढग अजूनही घोंगावत होते. या अगोदर कंस, जरासंध, शिशुपाल इत्यादी दुष्टांद्वारे पसरविलेल्या अनाचाराचे अंश अद्याप बाकी होते. या सूक्ष्म वातावरणाच्या शुद्धीसाठी पांडवांनी श्रीकृष्णाच्या नेतृत्वाखाली व्यापक स्तरावर राजसूय यज्ञांचे आयोजन केले होते.

या नंतर देखील भारतभूमीवर वेळोवेळी जेव्हा वातावरणाच्या शुद्धिकरणाची आवश्यकता भासली, तेव्हा यासाठी आत्मज्ञानी तत्त्वचिंतकांनी सामूहिक धर्मानुष्ठानाच्या रूपात यज्ञास प्राथमिकता दिली होती.

विसाव्या शतकात दोन महा विनाशकारी जागतिक युद्धे झालीत. त्यामध्ये पर्वताएवढा दारू गोळा वापरण्यात आला, विध्वंसकारी बॉंब वर्षाव झाला. कोट्यवधी लोक मृत्युमुखी पडले. आसुरीवृत्तीने क्रूरता व राक्षसी सर्व मर्यादा ओलांडल्या होत्या. यातना व क्रूर कृत्यांची दृश्ये एवढी बीभत्स होती की सैतानाचा आत्मा सुद्धा थरथर कापावा. दोन महायुद्धांव्यतिरिक्त हंगेरी, इस्राइल, कोरिया, व्हिएटनाम व आखाती देशातील किती तरी लहान सहान युद्धे झालीत. भारताची फाळणी झाल्यावर नरसंहार, जपानवर अणुबॉंबचा झालेला अमानवी हल्ला यासारख्या भयानक घटनांचे पडसाद सूक्ष्म वातावरणामध्ये आकांड-तांडव करीत आहेत.

वातावरणामध्ये पसरलेले वैचारिक प्रदूषण ही आजची

मुख्य समस्या आहे. आसुरी प्रवाहांनी पूर्वीपेक्षा अधिक सूक्ष्म आणि व्यापक रूप धारण केले आहे. संपूर्ण वातावरणात आसुरी उन्मादाची हवा सळसळत आहे. प्रत्येक व्यक्तीचे मन मस्तक या प्रवाहामध्ये फसून वाहत आहे, या उन्मादी प्रभावामुळे लोक वासना, तृष्णा आणि अहंतेच्या चक्रव्यूहात गुरफटले आहेत. चहुकडे पाप-पतनाची दृश्ये दिसून येत आहेत. मद्य, मांस, व्यभिचार, अपराध, हिंसा, भ्रष्टाचार, अतिरेकी घटना वाढतच आहेत. पर्यावरण प्रदूषणापासून तो निसर्ग प्रकोपाच्या घटना मानवाच्या व पृथ्वीच्या अस्तित्वास वेगळेच आव्हान देत आहेत.

सरकार व वैज्ञानिकांचे या संदर्भात सुरू असलेले भौतिक प्रयत्न पूर्णपणे अयशस्वी ठरत आहेत. त्यांच्याकडून एका समस्येचे समाधान होईपर्यंत इतर अनेक समस्या 'आ' वासून पुढे येतात. खरे तर आज वैचारिक प्रदूषणाच्या व्यापक आसुरी महापुरापासून वाचण्यासाठी स्थूलउपचारापेक्षाही अधिक प्रभावशाली अशा योग्य सूक्ष्म उपचारांची आवश्यता आहे. वातावरणाच्या साफ-सफाई सोबतच विनाशाचे काळेकुट्ट ढग मग आपोआपच दूर होत जातील. विद्यमान वातावरणाच्या वैचारिक विषाक्ततेचा उपचार करण्यात ऋषींद्वारे संशोधित व निर्धारित यज्ञ प्रणालीच पूर्णपणे सक्षम आहे.

**युग समस्यांच्या निराकरणासाठी गायत्री यज्ञ-** यज्ञास भारतीय संस्कृतीचे पिता व गायत्रीस भारतीय संस्कृतीची माता मानले जाते. हे दोन्ही परस्पर पूरक असल्याचे मानले जाते. गायत्री जपाचे अनुष्ठान यज्ञाविना पूर्ण होत नाही. पूर्वीच्या काळी वेळ, साधन-सामग्री इत्यादींची कमतरता नव्हती. म्हणून त्या वेळी जपसंख्येच्या एक दशांश भागाचे हवन केले जात असे. आजची परिस्थिती बघता जपाच्या एक शतांश हवनाचे विधान

आहे. जे एवढे सुद्धा करू शकत नाहीत, त्यांच्यासाठी विशेष मार्ग शोधला आहे की जपाचा दहावा हिस्सा वेगळा जप करावा व त्यालाच यज्ञाचे जागी मानून यज्ञपूर्ती झाल्याचे समजावे; यावरून हे लक्षात येते की यात यज्ञाची उपेक्षा केली नसून यज्ञाची अनिवार्यताच विशद केली आहे.

खरे तर गायत्री व यज्ञ हे दोन्ही एकत्र आले तरच जीवनाचे पूर्णत्व सिद्ध होते. एक ज्ञानाचा तर दुसरा विज्ञानाचा प्रतिनिधी आहे. ज्ञान व विज्ञानाच्या बळावरच व्यक्ती किंवा राष्ट्र उन्नती करू शकते. या दोन्ही बाबींची जिथे उणीव निर्माण होते, तिथे पतनाची सुरुवात होते.

ज्ञानाचा अर्थ आहे- विद्या, बुद्धिमत्ता, समजुतदारपणा, सद्‌भावना, विवेक व न्यायप्रियता आणि विज्ञानाचा अर्थ आहे- साधन, शक्ती, संपन्नता, बल, योग्यता व शीघ्र यशस्वी होण्याचे सामर्थ्य. जेव्हा दोन्ही क्षेत्रांमध्ये संतुलित उन्नती होते, तेव्हाच खरा विकास होतो. प्राचीन काळी भारतभूमी या दोन्ही बाबींनी परिपूर्ण होती. सामान्य जनतेपासून राजपरिवार व ऋषी आश्रमांपर्यंत ज्ञान-विज्ञानाविषयी आस्था होती. यामुळेच प्राचीन भारत विद्यासंपन्न तर होताच शिवाय शक्तिशाली पण होता. ऋषीगण भक्तिभावनेद्वारे जेथे भगवंतांचे चरणी लीन-तल्लीन राहायचे, तेथेच कठीण तप-साधनेद्वारे प्रबळ शक्तीसुद्धा प्राप्त करीत असत.

आज ज्ञान आणि विज्ञान दोन्ही बाह्य जगापुरते व व्यावहारिकपणापुरतेच मर्यादित झाले आहेत. मोठ-मोठे विद्वान, रिसर्च स्कॉलर, तज्ज्ञ इत्यादी तर निर्माण होत आहेत, परंतु त्यांच्यामध्ये महानता, उदार चिंतन व लोकसेवेची त्यागभावना यांचा अभाव दिसून येतो. हे दोन्ही मनुष्यास अधिक स्वार्थी, धूर्त

व विलासी बनवीत आहेत. दुसरीकडे विज्ञानाची जी प्रगती होत आहे, तिच्या मुळे एकीकडे थोडा लाभ होतो, तर दुसरी कडे त्यापेक्षा कितीतरी जास्त हानी होते. रासायनिक खतांनी उत्पादनात वाढ तर केली; परंतु त्यापासून उत्पन्न होणाऱ्या फळे, भाजीपाला व अन्न धान्यामधील पौष्टिक तत्वे कमी होत आहे. कारखान्यांमधून वस्तू फार मोठ्या प्रमाणात उत्पन्न होत आहेत, परंतु त्यांच्यामधून निघणारा धूर व प्रचंड आवाज यामुळे तेथे काम करणाऱ्या व जवळपासच्या लोकांवर जो दुष्प्रभाव पडत आहे, तो चिंतेचा विषय आहे. एकंदरीत आजच्या विज्ञानाच्या प्रगतीने मानव व पृथ्वीच्या विनाशाची पुरेपूर तयारी करून ठेवली आहे.

प्राचीन काळी ज्ञान-विज्ञानाचे आधार हे हल्लीपेक्षा वेगळे होते. आजचे संशोधन, शोधा-शोध बाह्य जड वस्तू व परमाणूमध्ये होत आहे. प्राचीन काळी हे संशोधन व्यक्तीच्या अंतरंगात, तिच्या चेतनेमध्ये होत असे. बाह्य भौतिक शोध देखील आंतरिक शक्तीच्या आधारे होत असत. म्हणूनच ऋषींना आजच्या सारख्या सुसज्ज प्रयोगशाळांची आवश्यकता नव्हती. त्यांचे प्रयोग, शरीर व चेतनेच्या प्रयोगशाळेतच चालत असत.

त्याकाळी ज्ञान-विज्ञानाचे संशोधन गायत्री व यज्ञाच्या आधारांवर होत असे. गायत्रीस संस्कृतीची जननी व यज्ञास संस्कृतीच्या पित्याचा दर्जा प्राप्त झाला होता. गायत्री ज्ञान रूपिणी आहे, तर यज्ञ विज्ञानाचे प्रतीक आहे. गायत्री मंत्राच्या २४ अक्षरांमध्ये मनुष्याच्या सद्बुद्धीस जागवून, त्यास जीवन लक्ष्य दाखविण्याचे व ते साध्य करण्याचे ज्ञान व प्रेरणा भरलेली आहे. या व्यतिरिक्त या मंत्राच्या अक्षरांची गुंफण ही ध्वनी विज्ञानाच्या रहस्यपूर्ण आधारावर झाली आहे. याच्या केवळ उच्चारणानेच शरीर

व मनातील सुप्त दिव्य शक्तींची जागृती होते, सद्‌गुणांमध्ये झपाट्याने वृद्धी होते व अशी समज, हुशारी वृद्धिंगत होते की जिच्यामुळे जीवनातील अनेक गुंते व समस्या सोडविल्या जातात.

यज्ञाचे विज्ञान देखील खूपच महत्त्वपूर्ण आहे. यामध्ये विशेष गुणयुक्त समिधा आणि हवन सामग्रीचे विशिष्ट आकृतींच्या कुंडांमध्ये हवन केल्याने व्यक्तीस रोग उपचारांपासून तर आरोग्यप्राप्तीचा लाभ होतो. यासोबतच वेदमंत्राचे शक्तिशाली ध्वनीतरंग आणि यज्ञाग्नी व्यक्तीच्या चित्तास एक प्रकारच्या अग्नितापात तापवून तिच्या मनोविकारांचे शमन करतात. मनास शुद्ध करून मनुष्याच्या ब्राह्मणत्वास व ऋषि-तत्त्वास जागृत करतात. यज्ञाचा बाह्य प्रभाव वायूमंडळाच्या शुद्धीपासून तर वातावरणाच्या शुद्धीपर्यंत जुळलेला आहे. आकाशात प्राणऊर्जेची वृद्धी होते, जी प्राणपर्जन्याच्या रूपात संपूर्ण सृष्टी व प्राणिमात्रांना पुष्ट करते. यज्ञाशी देवशक्तींची प्रसन्नता सुद्धा अभिन्न रूपाने निगडित आहे, जी आपल्या सहयोगाद्वारे सृष्टिसंतुलनामध्ये आपली विशेष भूमिका संपन्न करते. यज्ञ मनुष्यास यज्ञीय जीवन जगण्याचे शिक्षण व प्रेरणा देतो. या यज्ञीय जीवनावरच सभ्य समाजाचे अस्तित्व टिकून असते. अशा प्रकारे यज्ञाच्या विज्ञानामध्ये व्यक्तीपासून समाजापर्यंत व प्रकृती-पर्यावरणापासून वातावरणास प्रभावित करण्याची शक्ती विद्यमान आहे. अशा अनेक कारणामुळे यज्ञास भारतीय संस्कृतीच्या पित्याचा दर्जा दिल्या गेला आहे व यास प्रत्येक कर्माशी अनिवार्यपणे जोडण्यात आले आहे. युग समस्यांचे समाधान व सांस्कृतिक पुनरुत्थानासाठी ज्या ज्ञान व विज्ञानाची आवश्यकता आहे, ते सर्व काही गायत्री मंत्र व यज्ञामध्ये विद्यमान आहे.

**युग निर्माण मिशनचे यज्ञ आंदोलन-** युग निर्माण अभियानाच्या तत्त्वावधानामध्ये गायत्री यज्ञांची शृंखला ही याच उद्दिष्टास समोर ठेवून सुरू केलेली व तीव्र गतीने वाटचाल करीत असलेली एक अभिनव मोहीम आहे. हे अभियान प्रचारात्मक, रचनात्मक आणि सुधारणात्मक अशा कित्येक स्तरांवर सक्रिय आहे, परंतु याचा सूक्ष्म वातावरणाच्या शुद्धीचा पक्षच प्रधान राहिला आहे.

वस्तुतः हे ऐतिहासिक अभियान आधुनिक युगाचे विश्वामित्र, युगऋषी पं. श्रीराम शर्मा आचार्यजींच्या प्रचंड तपसाधनेतून प्रगट झाले आहे. त्यांनी सर्वप्रथम आपल्या भगीरथ पुरुषार्थाद्वारे लुप्तप्राय गायत्री विद्येस युगशक्तीच्या रूपात अवतरित केले आणि तिला सर्वसामान्य जनांमध्ये सुलभ व सुगम बनविले व नंतर आपल्या अथक-अनवरत प्रयासाद्वारे संस्कृतीच्या यज्ञ पित्यास युगानुकूल वैशिष्ट्यपूर्ण स्वरूपात सर्व सामान्यांमध्ये लोकप्रिय बनविले.

प्राचीन ऋषींप्रमाणेच त्यांनी युगातील संकटांना व समस्यांना बारकाईने समजून घेतले व वातावरणात व्याप्त असलेल्या सूक्ष्म प्रदूषणाच्या सफाईसाठी गायत्री साधनेबरोबरच यज्ञीय कार्यक्रमांना प्रोत्साहन व प्राधान्य दिले. या अंतर्गत लहान यज्ञापासून तो विराट अश्वमेध यज्ञापर्यंतचे कित्येक प्रयोग संपन्न झाले आहेत. परंतु यांचा शुभारंभ १९५३ च्या गायत्री जयंतीच्या दिवशी झाला होता. यावेळी आचार्य श्रीं नी १९२६ मध्ये सुरू केलेल्या आपल्या २४ लाखाच्या २४ गायत्री महापुरश्चरणांची पुर्णाहुती मथुरेमध्ये सहस्रांशू ब्रह्मयज्ञाने संपन्न केली होती. या विराट महायज्ञासोबतच गायत्री परिवाराच्या स्थापनेचा प्राथमिक

श्रीगणेशही झाला.

या नंतर इ.स. १९५५ मध्ये विशिष्ट यज्ञांच्या शृंखले-अंतर्गत महामृत्युंजय यज्ञ, विष्णू यज्ञ, शतचंडी यज्ञ, नवग्रह यज्ञ व चारही वेदांच्या यज्ञांचे आयोजन केले गेले. यांच्या समाप्तीनंतर इ.स. १९५६ मध्ये १०८ कुंडी यज्ञ व नरमेध यज्ञ आयोजित करण्यात आले. यांचा उद्देश समाजसेवेसाठी समर्पित व्यक्तींचा शोध घेणे हा होता. या मध्ये २०,००० पेक्षाही अधिक व्यक्तींनी भाग घेतला होता. याच आयोजनांतर्गत नंतरच्या वर्षामध्ये संपूर्ण भारतभर १०८ स्थानी लहान-मोठ्या रूपात गायत्री महायज्ञांची घोषणा केली गेली, ही संख्या वाढत वाढत १००८ पर्यंत जाऊन पोहचली होती. हे यज्ञ ५ व ९ कुंडी पासून तो १०८ कुंडी स्तरांचे होते.

या सर्व यज्ञ व महायज्ञांच्या शृंखलांद्वारे एक व्यापक व सूक्ष्म मंथन सुरू होते, जे एका विशिष्ट सुनियोजित पद्धतीने एका सुनिश्चित उद्दिष्टपूर्तीच्या दिशेने वाटचाल करीत होते. इ.स.१९५६ मध्ये प.पू. गुरुदेवांनी एक वर्षभर २४ लाख गायत्री महामंत्राच्या महापुरश्चरणास सामूहिक स्तरावर संपन्न करण्यावर भर दिला. यास त्यांनी आध्यात्मिक ब्रह्मास्त्र हे नाव दिले होते. हे इ.स. १९५७ च्या संभाव्य नैसर्गिक प्रकोप, महामारी, अंतर्ग्रही दुष्प्रभाव व युद्धोन्मादाच्या शक्यतांपासून मानवमात्राचे रक्षण करण्याच्या उद्देशाने संपन्न केले गेले. इ.स. १९५७ मध्ये पहिले "अखिल भारतीय गायत्री परिवार संमेलन" आयोजित केले गेले. यामध्ये गायत्रीविद्या आणि यज्ञ-भावनेच्या विस्ताराचे प्रारूप विशद करण्यात आले.

इ.स. १९५८ मध्ये ब्रह्मास्त्र अनुष्ठानाची महापूर्णाहूती १००८ कुंडीय विराट महायज्ञाने संपन्न झाली. यामध्ये सुमारे चार लाख

व्यक्तींनी भाग घेतला. हा प्रत्येक दृष्टीने आपल्या वैशिष्ट्याचा एक अभिनव यज्ञ होता. मिशनचे हे एक क्रांतिकारी व नावीन्यपूर्ण वळण होते. हा जिथे अदृश्य वातावरणास प्रभावित करणारा एक समर्थ प्रयोग होता, तिथेच गायत्री परिवाराचा विधिवत शुभारंभ देखील यापासूनच झाला.

यानंतर घरगुती, सामूहिक आणि विराट स्तरीय भिन्न-भिन्न प्रकारचे अभिनव यज्ञ केले गेले. या अंतर्गत सर्वसामान्य कुंड यज्ञापासून, दीपयज्ञ आणि वाजपेय यज्ञापासून तर अश्वमेध यज्ञांपर्यंतची लांबलचक शृंखला जुळलेली आहे. ही यज्ञीय शृंखला धर्म-तंत्रातून लोकशिक्षणाशी जुळून, सूक्ष्म वातावरणाच्या शुद्धीसोबतच जनमनास प्रशिक्षित करीत नवनिर्मितीची पृष्ठभूमी तयार करीत आहे. हिच्या अंतर्गत यज्ञविद्येस एवढे सरळ, सोपे, सुगम व स्वस्त बनविले आहे की गरीब व्यक्ती देखील याचा लाभ प्राप्त करून घेऊ शकेल. तसेच ही यज्ञविद्या एवढी युगानुकूल आणि व्यावहारिक बनविली आहे की कोणत्याही धर्म, पंथ, संप्रदाय, मत व विश्वासाची व्यक्ती या मध्ये बेधडक व आवडीने भाग घेऊ शकेल. प्रत्येक स्तरावर प्रत्येक प्रकारच्या व्यक्तींना यज्ञीय भावनेने जोडणाऱ्या अभियानाने आपली प्रदीर्घ वाटचाल केली आहे.

इ.स. १९५८ च्या एक हजार कुंडीय विशाल महायज्ञानंतर २४०० गायत्री शक्तिपीठे आणि २४ हजार प्रज्ञा संस्थांनी या कार्यास आपल्या सामर्थ्यानुसार सुरू ठेवले आहे. इ.स. १९७० मध्ये स्थापन करण्यात आलेल्या युगतीर्थ शांतिकुंज हरिद्वारच्या नऊ कुंडी यज्ञ शाळेमध्ये दररोज नित्य-नेमाने गायत्री यज्ञ सुरू आहे. असाच उपक्रम गायत्री तपोभूमी-मथुरा येथे सुद्धा सुरू आहे. प्रचारक कार्यकर्त्यांच्या टोळ्या राष्ट्रव्यापी दौऱ्यावर जाऊन यज्ञायोजन

करतात, २४ कुंडी यज्ञापासून १०८ कुंडी यज्ञांपर्यंतचे सामूहिक यज्ञ-हवनाचा यात समावेश असतो. देशाच्या काना- कोपऱ्यांमध्ये आतापर्यंत असे लहानमोठे २४ लाखांहून अधिक यज्ञ संपन्न झाले आहेत. यामध्ये देवदक्षिणेच्या रूपात आतापर्यंत लक्षावधी व्यक्ती नशा, दुर्व्यसने, मांसाहार या सारख्या कितीतरी वाईट सवयींचा त्याग करून, चांगल्या बाबींचा आपल्या जीवनात अंगीकार करून, जीवन सुधारून ते सुव्यवस्थित सुंदर बनविण्याचा संकल्प घेऊन कृतकृत्य झाले आहेत. यज्ञाच्या साक्षीने जीवनाची दिशा बदलण्याचे असे अनेक प्रसंग यज्ञाच्या प्रचंड व दिव्य प्रेरणेचाच चमत्कार आहेत.

याच उपक्रमात इ.स. १९८६-८७ च्या राष्ट्रीय एकता संमेलनांच्या झंझावाती कार्यक्रमांची एक हजार स्थळांवर विराट यज्ञायोजने संपन्न झालीत. इ.स. १९८८ मध्ये सुरू झालेल्या युगसंधी महापुरश्चरणांतर्गत इ.स. २००० पर्यंत एक लाख यज्ञांचा संकल्प घेण्यात आला होता व तो गायत्री परिवाराशी जुळलेल्या जगभरातील परिजनांद्वारे आपापल्या स्तरावर सुनियोजित पद्धतीने यशस्वीपणे-संपन्न झाला.. मिशनचा मत्स्यावतारी विस्तार लक्षात घेता इ.स. १९८८ पासून कुंडीय यज्ञांना पर्याय म्हणून ज्ञान-यज्ञाच्या प्रतीक-स्वरूप दीपयज्ञांची नवीन शृंखला सुरू करण्यात आली आहे. हा हल्लीच्या जीवघेण्या महागाई, अती व्यस्तता, अश्रद्धा व शुद्ध वस्तूंच्या अभावासारख्या कित्येक व्यावहारिक समस्या लक्षात घेऊन यज्ञास स्वस्त व सर्व सुलभ बनविण्याचा क्रांतिकारी प्रयत्न होता. या मध्ये अग्निहोत्राची स्वयंचालित प्रक्रिया दीपकांमधे तूप व उदबत्तीमधे हवन सामग्रीच्या रूपात विद्यमान होती. या दीपयज्ञांच्या प्रकाशात जन्मदिन समारंभापासून प्रत्येक शुभकार्याचा शुभारंभ

तसेच महासंमेलनांचे रूप दीपयज्ञमय बनत गेले. कमीत कमी कर्मकांडासह संपन्न होणाऱ्या दीपयज्ञांनी प्रत्येक वर्ग व भिन्न मतावलंबी लोकांमध्ये आश्चर्यजनकपणे लोकप्रियता मिळविली. न्यूनतम कर्मकांड व सरळ-सोपा विधी असूनही त्यांनी आपल्या प्रचंड,प्रखर व दिव्य प्रेरणा प्रवाहाद्वारे जनमनास यज्ञीय भावनेशी जोडून सूक्ष्म जगतास व्यापक स्तरावर प्रभावित केले आहे.

पूज्य गुरुदेवांच्या महाप्रयाणानंतर दोन वर्षांनी माताजींच्या प्रत्यक्ष संरक्षण व मार्गदर्शनाखाली संपन्न झालेले विराट अश्वमेध यज्ञ हे मिशनच्या यज्ञ अभियान शृंखलेतील महत्त्वपूर्ण मैलांचे दगड सिद्ध झाले. ते राष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासातील अभूतपूर्व अविस्मरणीय घटना बनले. दोन-तीन वर्षांच्या आतच भारत तसेच परदेशातील २७ ठिकाणी हे आयोजित केले गेले. यांच्या अद्भुत यशस्वितेने सर्वांना विस्मित केले. सांप्रदायिक विद्वेष, जातीय कडवटपणा व धार्मिक असहिष्णुता यांनी युक्त वातावरणात देखील प्रत्येक जातीच्या तसेच विभिन्न धर्म-संप्रदायांच्या लोकांनी आपापसातील कटुता, मतभेद आणि दुराग्रहांना बाजूला सारून यामध्ये हिरीरीने भाग घेतला व सर्व प्रकारचे सहयोग-सहकार्य केले. खरे तर हा यज्ञविज्ञानाद्वारे वातावरणास आपल्या दैवी प्रवाहाद्वारे ‘चार्ज’ करून जनमनास, समूह मनास उदार सहयोग, सद्भाव व त्यागाच्या यज्ञीय आदर्शांशी जोडण्याचा प्रत्यक्ष चमत्कार होता. यांच्याद्वारे जल, वायू आणि धरतीस मोठ्या प्रमाणात प्रदूषणमुक्त करण्याच्या तथ्यास व दाव्यास वैज्ञानिकांनी केलेल्या परीक्षण-निरीक्षणाच्या शोधपूर्ण अभ्यासाने सत्य सिद्ध केले आहे.

गुरुसत्तेच्या दिव्य संरक्षणामध्ये सुरु असलेले हे अभियान भारतापुरतेच मर्यादित नसून सातासमुद्रापलीकडील ८० देशांमध्ये

संस्कृती दूतांद्वारे हे यज्ञीय ज्ञान-विज्ञान, दिव्य प्रेरणा व संदेश पोहचविला आहे, पोहचवत आहेत. आतापर्यंतच्या यज्ञ अभियानाच्या प्रयत्नांचा, कार्यांचा आढावा घेतला, तर हे अभियान रामायण व महाभारत कालीन यज्ञांद्वारे झालेल्या प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष उपचारांपेक्षा तसूभरही कमी नाही उलट भारीच सिद्ध होईल. युग संधी महापुरश्चरणाच्या महापुर्णाहुतीच्या ऐतिहासिक प्रसंगी गुरु ग्राम आँवलखेडा (आग्रा) व हरिद्वार येथील सहस्त्र कुंडीय महायज्ञांमध्ये एक कोटीहून अधिक साधकांच्या भागीदारीचा विश्वविक्रमी अध्याय पण या अभियानाशी जुळला आहे.

संपूर्ण मानव जातीस यज्ञीय भावनेशी जोडणारे हे अभियान मनुष्यास शरीराने निरोगी, शांत व शुद्ध करीत त्याच्या मधील सुप्त देवत्वास जागे केल्याविना राहणार नाही, तसेच आपल्या सूक्ष्म आणि व्यापक प्रभावाद्वारे वातावरण आणि पर्यावरणास शुद्ध व संतुलित करीत पृथ्वीवर स्वर्गीय स्थिती आणून दाखवील यात तिळमात्र शंका नाही. भावी युगाचा सत्युगी समाज यज्ञाच्या ज्ञान-विज्ञानावरच टिकून राहील. संस्कृती-पिता यज्ञदेवाची गावो-गावी, घरोघरी स्थापना होताच प्रत्येक गाव तीर्थ व संपूर्ण देश तपोभूमी बनेल. भारतभूमी पुन्हा आपले गमावलेले वैभव व गौरव प्राप्त करील व त्याच्या प्रकाशात संपूर्ण मानवाचे भविष्य नक्कीच उज्ज्वल बनेल. मात्र यासाठी आवश्यकता आहे ती यज्ञाच्या भावनेस व मर्मास समजून घेण्याची, त्यास जीवनात उतरविण्याची तसेच या पावन यज्ञ अभियानास यशस्वी बनविण्यासाठी यथा संभव भूमिका संपन्न करीत भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करण्याची

